MARAT,HA

TRANSLATION OF

# ESOP'S FABLES.

इसप नीतिकथा

सदाशिव काशीनाथ छत्रे

यांणीं

इंग्रेजीवरून मराठी भाषेंत केल्या.

मुंबईची शिक्षा मंडळीचे

छापखान्यांत छापिल्या.

सन इसवी

१८२८

1828

शक शालिवाहन

१७५०

# अनुक्रमणिका



* This column refers to the corresponding Fable in Croxall's Esop, London 20th Edition.

## क

कोल्हा

दोन

पारधी

बेडूक

मांजर

र

ल

सता

सिंहाचे

ह



समाप्त

श्री

गोष्ट—१

## कुतरा आणि त्याचें प्रतिबिंब

एक कुतरा तोंडीं मासाचा तुकडा धरून नदी उतरून पैलीकडे जातहोता त्याणें आपली पड छाया पाण्यांत पाहिली तेव्हां त्यास वाटलें कीं हा कोणी दुसरा कुतरा मास तोंडांत घेउन जात आहे तें आपण त्याजवळुन हिरून घ्यावें असा वि चार करून तोंड उघडून लोभानें तें धरावयास गेला तों तोंडातील मास पाण्यांत पडून तळीं गे लें तें पुनः त्यास सांपडलें नाहीं

### तात्पर्य

देवानें आपल्यास जें दिलें त्यामध्यें संतोष न मानून जो पुरुष दुसऱ्याचें घ्यावयास पाहातो त्यास तें नमिळून जवळ असतें तेंहीजातें

गोष्ट—२

गोष्ट—२

बैल आणि बेडूक

एक बैल कुरणात चरतअसतां तेथें लाहान लाहान बेडूक खेळत होते त्यांतील एक बेडूक बैलाचे पायांखाली चेपून मरण पावला तें वर्तमान दुसरे बेडूकानी घरी जाउन आपले आईस सांगीतलें आणि बोलिले आई इतका मोटा प्राणी आह्मी कधींही पाहिला नहोता तेंऐकून बेडकीण आपलें पोट पुष्कळ फुगउन त्यांस बोलते- काय तो इतका मोटा आहे-ते ह्मणाले आई याहुन अतिशय मोटा आहे पुनः जमळ अधिक पोट फुगउन ती बोलिली इतका आहे-ते ह्मणाले आई तूं पोट फुटेपर्यंत फुगलीस तथापि त्याचे बरोबरीस पावणार नाहीस तें ऐकून गर्वाने ती आणिखीही फुगोंलागलीअसतां पोट फुटून मृत्यु पावली

तात्पर्य

दुर्बळाने आपलें सामर्थ्य पाहून वेच करावा श्रीमंताची

मंताची बरोबरी करायास इछील तर बेडकिणी सारखा नाश पावेल

गोष्ट—३

कोल्हा आणि द्राक्षें

एक कोल्हा भुकेने पीडित फिरत फिरत द्राक्षाचे मांडवाखाली आला वरतीं पाहातो तंव सुंदर पिकलेले द्राक्षांचे घोंस लोंबत आहेत परंतु मांडव उंच यामुळें हातीं लागत ना ह्मणून उड्या मारून मारून थाकला एकही द्राक्ष प्राप्त झालें नाही शेवटीं अमळ दूर जाउन द्राक्षांकडे पाहून ह्मणतो हीं द्राक्षें जो घेईल तो घेऊ मीतर हिरवीं आंबट ह्मणून सोडून जातों

तात्पर्य

कित्ती एक पुरुष असे असतात कीं त्यांचे हातीं जी वस्तु लागत नाहीं तीस कांहीं खोड ठेउन आपला हलकेपणा दाखवित नाहींत

गोष्ट—४

## गोष्ट—४

### किरडुं आणि कानस

एककिरडुं लोहाराचे दुकानांत जाउन कांहीं खावयाचे पदार्थाकरितां खालीं वर टेहळीत होतें तों त्याणें एक कानस पाहिली ती चावावयास लागलें तेंतमई कानस त्यास धिक्कारुन बोलते मूर्खा तूं माझे वाटेस जाउंनको जी मी लोखंड आणि तिखें यांसही चावणार त्यासला चाउन तुझे दांत मात्र पडतील

### तात्पर्य

पुढिलाचें सामर्थ्य पाहुन त्यास उपद्रव करणें तो करावा ज्यास सर्वलोक मानितात आणि ज्याचें ह्मटलेलें करितात त्यांशी विरोध केलाअसतां आपलेच नाशास कारण होईल तशीच शाहाणपणाचे बळाने थोराची टीका केलीअसतां आपलें मुर्खत्व मात्र दिसेल

गोष्ट—५

## कोल्हा आणि बकरा

एक कोल्हा पाणी प्यावयाकरितां एके विहिरीवर गेला तो आंत पडला त्याणें बाहेर निघायास फारवेळ यत्न केला परंतु कांहीं सोय सांपडेना इतक्यांत एक बकरा तेथें आला त्याणें त्यास पुशिलें अरे हें पाणी चांगलें आहे कोल्हा उत्तर करितो गड्या चांगलें ह्मणून काय सांगूं हें अमृतासारिखें गोड आहे पितां पितां माझी इछा तृप्तच होतनाहीं आणि येथोन जावें असें वाटत नाहीं तें ऐकून बोकडाने आंत उडी टाकिली त्याचीं शिंगें मोटीं होतीं त्याजवर कोल्ह्याने तत्क्षणीं पाय ठेविले आणि उडीमारून विहिरी बाहेर निघोनगेला मग बोकड गचकळ्या खातां खातां मृत्युपावला

तात्पर्य

लोक जेंजें करितात त्यांत आपआपला स्वार्थ पाहात

पाहातअसतात दुसऱ्याचे हितासाठींच उद्योग करणारे असे पुरुष विरळा ह्मणून जो कोणही कां हो लाभ दाखवील त्या मनुष्याची सचवटी मुळी पक्केपणी समजल्यावांचून त्याचे बोलण्यावर वि श्वास धरूनये

---

गोष्ट—६

गांवढेकर आणि साप

एक गांवढेकर कुळंबी थंडीचेदिवशीं परसां त काम करीतअसतां वईपाशी पडलेला एक सा प त्याणें पाहिला तो थंडीचे गारंवठ्यानें फार था कुळ अर्धघटिकेनें किंवा घटिकेनें मरणार असें पाहून कुळंब्यास दया आली मग त्या सापास त्या णें घरीं नेउन आगट्यापाशीं ठेविला तेथें शेका चे योगानें दाहा पांच पळानीं हुशार जाहालाअ सतां उभाराहुन राहुन फूत्कारकरून कुळंबीयाचे बायकामुलांचे आंगावर उडया टाकूंलागला तें

कहां

हां त्यांची दाणादाण जाहाली कुळंबी परसांत होता तो ती आरडाआरड ऐकतांच कुऱ्हाड हातीं घेउन आला त्याणें एके घायानें सापाचे दोन तुकडे केले घाय मारतांसमई त्यास हेशब्द बोलिला अरे दुष्टा ज्याणें तुझा जीव वांचविला त्याचे उपकार असे फेडिलेस आतां तुला मरण योग्य आहे परंतु हेमहापापिया तुझे अपराधास नुसत्यें मरणापेक्षां कांहीं अधिक शासन असावें

तात्पर्य

जो आपले हितकर्त्याचा घात करितो अथवा ज्याचें अन्न खातो त्याजवर फिरतो तो कृतघ्न महापापी तो मेला बरा त्याचें तोंड पाहुंनये

---

गोष्ट—७

पर्वत प्रसूत होतां कष्टत होता त्याची

कोणिएक पर्वत प्रसवतां कष्टतहोता त्याच्या मोठ्या आरोळ्या ऐकून जवळचे व दूरचे पुष्क

ळ

लोक एकत्र जाहाले आणि त्याचे पोटांतून कांही थोर चांगली वस्तु निघेल ह्मणून फारवेळ उत्कंठेने वाट पाहात होते शेवटी एक उंदिर उडीमारून बाहेर आला

तात्पर्य

कितिएक पुरुष मोटे राज्याधिकारावर असतां अनेकप्रकारें लोकांचें कल्याण करूं ह्मणून आव घालितात लोकही त्यांचा आव पाहून त्यांजवर फार भरवसा ठेवितात शेवटी ते अधिकारी आपला स्वार्थ साधून लोकांचें हित कांहींच करीत नाहीत

---

गोष्ट—८

अरण्य आणि लांकुडतोड्या

एक लांकुडतोड्या एके दिवशी रानांतअसतां आसपास पाहून दुःख करूंलागला तेव्हां झाडांनी त्यास पुसलें तुला काय पाहिजे त्याणें उत्तर केलें

माझे कुह्राडीस दांडा नाहीं त्याकरितां लाहानसा एक लांकडाचा तुकडा मिळता तर बरें होतें त्या काळीं सर्व झाडांहीं मिळून विचारकेला आणि त्या मनुष्यास चांगला चिंबड विंवेचलांकडाचा एक तुकडा दिल्हा लांकुडतोडयाने तो कुह्राडीस घालून लाहान मोठीं झाडें सरोभरीने तोडिलीं तेंव्हां सायाबावृक्ष इतरवृक्षांस बोलिला गडयोंहो आपण आपले हातीं आपला अनर्थकेला येथें दुसऱ्यास शद्व नाहिं

तात्पर्य

शत्रूची दया करून जो त्यास साहीत्य करीतो तो शेवटीं पश्चात्ताप पावतो शत्रूवर उपकार करावा त्याचे आन्याय क्षमा करावेयांत थोरपणा आहे परंतु जेंणेकरून तो बलवान्होउन उलटा उपद्रव करूंशकेल तें केल्यांत आपला मूर्खपणा आहे

## गोष्ट—९

### घोडा आणि सांभर.

एक घोडा आणि सांभर एके कुरणांत नित्य
एकत्र चरत असतां एके दिवशीं उभयतांची बो
लाचाली जाहाली सांभराने आपले शिंगांचे ब
ळाने घोड्यास कुरणाबाहेर काढूनदिल्हा ते
ऱ्हां सांभराचें पारिपत्यकरावें ह्मणोन घोडा मा
णुसापाशीं गेला आणि पाठराखकरावी ह्मणो
न प्रार्थना केलीअसतां माणुसाने त्याचे पाठीवर
खोगीर घातलें तोंडीं लगाम दिल्हा आणि वर च
ढून बसला फेरफटका करूनपाहातां कुल्यावर
चार फटकेही मारिले घोड्याने तें सर्व साहून माणु
साचे हातून सांभराचा पराजय केला नंतर माणु
सास बोलतो हेमनुष्या माझें कार्य जाहालें तु
झा फार उपकारी जाहालों आतां हें खोगीरलगा
म काढून मला आज्ञा दे तें ऐकून मनुष्य बो
लतो गड्या तूं इतका उपयोगी आहेस हें मला स

सजलें

मजलें नोहोतें आतां तूं या बंधनापासून सुटशील असें मला दिसत नाहीं

तात्पर्य

एकाचें पारिपत्य करावें ह्मणून दुसऱ्यास शरणजातां फार विचार करावा एकवेळ बळिष्ठाचे ऋणामांत सांपडलाअसतां पुनः मोकळीक होईल याचा भरवंसा नाहीं

---

गोष्ट--१८

सिंहाचेंसोंगघेणाऱ्या गाढवाची

एक गाढवास सिंहाचें कातडें सांपडलें तें त्याणें आंगावर घेतलें मग तो अरण्यांत किंवा चराचे जागीं गेलाअसतां त्रासाने सर्व श्वापदांनी त्यास पाहून पळतअसावें एके समयीं त्याचे धन्याची गांठ पडली त्यासही तो भिववुं लागला तेव्हां त्याचे लांबकान पाहून धन्यास ओळख

पडली

पटली कीं हा तर आपला गाढव आहे मग त्या णें हातीं एक सोटा घेवुन गाढवास चांगली शिक्षा केली आणि त्यास सांगितलें किं सिंहाचें कातडें पांघुरलाआहेस तथापि मी बरें जाणतों कीं तूं गाढव आहेस

तात्पर्य

जो कोणी आंगीं योग्यता नसतां शूरपणाचा जाणतेपणाचा अथवा संतपणाचा आव घालतो तो दुर्बळ अज्ञानजनास मात्र ठकवितो परंतु जाणत्यांशी गांठपडलीअसतां ते त्याचें स्वरूप ओळखून उपहास करितात

गोष्ट—११

मोटावृक्ष आणि लाहानझाड

एक मोटा वृक्ष नदीचे कडेस होता तो प्रचंड घाऱ्याचे झपाट्याने उपळून ओघांत वाहात आ

त

त असतां त्याच्या उहाळ्या नदीचे किनाऱ्यास लाहान झाड होतें त्यास झगडूनोव्या परंतु त्या झाडास दुखापत जाहालीनाहीं- तेव्हां तो वृक्ष आश्चर्य करून त्याझाडास बोलतो-रे तूं त्या वाऱ्याचे तुफानांत कसा वांचलास-ज्या वाऱ्यानें माझे सारि खाही वृक्ष समूळ उपटोनटाकिला - तेव्हां धा कटें झाड उत्तर करितें-बाबा आपली उभयतां ची रीति वेगवेगळालीपडली - मी वारा आला असतां त्यास लवून असतों जाणतों कीं बळ वंतापुढें आपलें चालणार नाहीं-आणि तूं आ पले बळावर भरवंसा ठेउन ताठयानें उभाच असतोस

तात्पर्य

ज्याशीं आपलें चालणार नाहीं त्याशीं नमून असावें तेथें गर्वकरणें हा वेडेपणा

---

गोष्ट—१२

सिंह आणि चारबैल

चौघे बैल मैत्रीकरून एकठांईं चरतअसत व

व एकमेकास विसंबत नसत-एक सिंह त्यां स नित्य पाहुन मनांत ह्मणे कीं यांतीन एकादा खावयास मिळता तर बरें होतें-तो सिंह एक एकास मारायास समर्थ होता परंतु चौघांची एक जुट पाहून त्यांजवर उडी घालायास त्यास धैर्य होईना-तेंव्हां कित्तीक दिवस पर्यंत दूर राहुन टेहळीत होता पण कांहीं लाग साधेना-शेवटीं त्याची खातरी झाली कीं जंव पर्यंत हे एकीत आहेत तंव पर्यंत माझें चालणारनाहीं तर आतां एक मेकाच्या चाहाड्या एक मेकास सांगून यांत फूट करावी-मग त्याणें तसें करितांच तेबैल आपआपल्यांत द्वेष करूं लागले आणि शेवटीं वेगळे पडले-नंतर एकएके बैलास मारायास सिंहास कांहींच श्रम पडलानाहीं

तात्पर्य

एकचित्त आहे पर्यंत शत्रूचें चालत नाहीं-एकींचें इतकें महात्म्य आहे ह्मणोन ती एकी चुगल्या

ऐकुन अथवा शत्रूचे गोष्टीस चित्त देउन तोडून द्या चित्तां दूरवर विचार करावा

गोष्ट १३

मनुष्य आणि सिंह

एकेरानकऱ्याची एकेदिवशीं सिंहाशीं गांठपड लीअसतां फारवेळ उभयतांचे बोलणें झालें तें एकाचें एकास बहुतकरून मानतचगेलें-शेवटीं मनुष्य श्रेष्ठ कीं सिंह श्रेष्ठ यावर गोष्ट निघाली तें व्हां दोघे भांडुंलागले-मनुष्यास आपलें बोलणें प्रतिपादावयास कांहिं सुचेना तेव्हां त्याणें त्याच ठिकाणीं सिंहास दोन बाहुलीं दाखविलीं तीं एक संगमरवरी दगडाचे चवथऱ्यावर बसविलीं होतीं आणि त्यांत असें दर्शविलें होतें कीं सिंहाच्या केसरट्या धरून मनुष्य त्याजवर स्वार झाला आहे-तें पाहून सिंह बोलला-झालें-तुझें साधन इतकेंच कीं-आतां माझें ऐक-तरड्या पाथरवटानें हीं बा

हुलीं

हुला केली तो मनुष्य होता-पाथरवट सिंहजर असता तर तूं येथें हेंच उलटें पाहातास

तात्पर्य

पक्षपाती आहेत ते आपल्थे कडचे लोकांचीव चनप्रमाणें पुढेंकरून आपआपला खरेपणा दाखवात असतात ह्मणोन पक्ष प्रतिपक्ष दोनी ऐकि ल्यावांचून एकादे गोष्टीचा सिद्धांत करूनये

गोष्ट १४

देव आणि गाडेकरी

एक आडाणी गाडेकरी गाडाहांकून नेतहोता तो एकेंठांई चाकें चिखलांत रुतोन अडकला असाकी बाहेर काढायास बैलांचा उपाय चालेना-ते पाहून गाडेकरी याणे देवाचा धांवा आरंभिला हेदेवा मी दीन आहें या संकटीं मला साह्यहो-तेंव्हां नीं पद्धतीच देवानें आकाशीं येउन पाहिलें तंव

गाडेकरी

गाडेवाली उगाचबसुन करुणा भाकीतोआहे-ते व्हां त्यास ह्मणतो रे मूर्खा तूं आळश्या सारिखा स्वस्थबसूनराहूंनको-ऊठ आणि बैलांस चांगल्या काट्यामार-चाकांस आपल्या खांद्याचा नेटावादे ह्मणजे मी तुला साह्य होईन-तुला माझें साहित्य असावें तर असा उद्योग कर-मग गाडेकऱ्यानें त सेंकरितांच गाडा चिखलांतून बाहेर निघाला—

तात्पर्य

उद्योग करून जो देवाकडे साहित्य मागतो त्या सच तें प्राप्त होतें निरुद्योग्यास होत नाहीं—



गोष्ट—१५

मनुष्य आणि हंसी

कोणी एका मनुष्यापाशी एक हंसी होती ती नित्य एकएक सोन्याचें अंडें घालितअसे तें घेउन त्यामनुष्याची आशा ऊणी व्हावी ती अ धिकच वाढतीआली-आणि त्यास वाटलें की जे

धून

थून अशीं आंडीं निघतात तें ठिकाण हातीं लागलें असतां अपार धन एकदांच प्राप्त होईल-मग त्या णें त्या हंसाचें पोट चिरिलें आणि पाहों लागला तं व आंत कांहींच सांपडलें नाहीं परंतु मोटापश्चा त्तापमात्र पावला—

तात्पर्य

ईश्वर ज्यास त्याग भोगापुरतें यथास्थित देतो त्याणें धनसंग्रह करणें तर त्यांतच हात राखून करित जावा हें नकरून जो अतिलोभ धरितो आणि एकदांच श्रीमंत व्हावें ह्मणोन एकादे मो टे कारखानास हात घालितो-त्याचा उद्योग नि ष्फळ होउन मूळचें असतें तेंही जातें—

गोष्ट—१६

पारवा आणि कोंबडे

कोणी एकानें एक पारवा धरिला त्याचे पाखां तील कांहीं पिसें उपटून ज्यांत कोंबडे ठेविले होते त्या कुपणांत तो सोडिला तेव्हां तेथें कोंब

ड्यानीं

डयानी त्यास क्षणक्षणा टोचितअसावें-वाऱ्याव रून हाकलूनद्यावें-असे त्याणें कितिएक दिवस फार केशानें काढून मनांत निश्चयकेला की आप ल्ये घरी आलेल्ये पाहुण्याचा समाचार न घेतां उ लटी त्यास पीडाकरितात तस्मात् हे ग्रहस्थ न व्हत मोठे निर्दय शठ आहेत-पुढें त्याणें असें पा हिलें की ते कोंबडे दाहापांचवेळ आपआपल्यां त भांडून एकमेकास मारूंलागले तेंव्हां त्याणें अ सा विचार करून आपलें समाधान केलें-अरे जे हे आपल्या जातीस उपद्रव करावयास चुकत ना हीत ते परवयाला मला करितात यांत काय आ श्चर्य—

तात्पर्य

जे लोक आपल्येजातीत कलहकरून एकमे कास उपद्रप करितात त्याणी परके जातीच्याचा द्वेष केल्यास त्याणें खिन्न होऊंनये—

गोष्ट—१७

वस्तूरिकामृग

कोणेएके जातीचा हरिण आहे त्याच्या बेंबी त कस्तूरी सापडत्ये ह्मणून तो इष्टीस पडला असतां पाठलाग करून लोक त्याचा प्राणच घेतात-एके समयीं असा एक हरिण पळतोआहे आणि त्यामागें कुत्री व पारधी लागलेआहेत त्यासमयीं हरिणास प्राणसंकट पडलें-निभावणीची वाट सांपडेना-इतक्यांत त्यास विचार सुचला कीं हे घातकी कस्तूरीकरितां मला मारायास इछितात दुसरें कांहीं कारण नाहीं-त्यास तितकी टाकून दिली तर सुखी होईन-मग त्याणें धैर्यकरून तसें केलेंअसतां संकटांतून मोकळा झाला—

तात्पर्य

एकाचे पाठीस एक मनुष्य लागतें त्यास बहूत करून लोभावांचून दुसरें कारण नसतें ह्मणून जेव्हां असा प्रसंग पडतो आणि दुसरा कांहीं उपाय चालत नाहीं तेव्हां असें करावें कीं ज्या वस्तूचा



स्तूंच्या लोभानें दुष्ट आपणास छळितील तीं टाकू न द्यावीं-आणि शोभा राखुन आपला बचाव हो ईलतर करावा-शोभा राहुन यद्यपि सर्वस्वाची हाणी झाली तो हाणी असें मानूंनयें—

---

गोष्ट—१८

गळकरी आणि मासा

एके मनुष्याने नदीत गळ टाकिला त्यास एक मासा लागला तो बाहेर काढून टोपलींत टाकि तोआहे इतक्यांत तो मासा त्याची प्रार्थना क रूंलागला हें पुण्यपुरुषा-क्षमाकरून मला पुनः न दीत टाक-गळकऱ्यानें त्यास पुसिलें अरे मी तुज वर एवढा उपकार कां करावा तें सांग-मासा बो लतो-मी लाहान बाळक आहें ह्मणोन आज त सा तुझें उपयोगीं पडणार नाहीं जसा मोठा हो उन पुढें उपयोगी पडेन- गळकरी उत्तर करि तो-होय-ती गोष्ट खरी-परंतु मी तो मुर्ख नव्हें जो प्राप्त सोडून अप्राप्तावर आशा ठेवितो—

तात्पर्य

तात्पर्य

जोपुढले भरवशावर हातीलागलेली वस्तू सो डितो त्यास दोन्ही नाहिशी होतात-नमिळाल्या वस्तूची इछा करावी यांत कांही वांकडें नाहि प रंतु तीचे भरवशावर हातचें टाकणें तें बहुत वा रून पुढें खेदास कारण होतें—

---

गोष्ट—१९

दोघे बेडूक

कोणे एकेसमयी मोटा उन्हाळा पडला असतां न द्यो विहिरी सर्वत्र आटोन गेली त्यावेळेस दोघे बेडू क पाण्याचा शोध करित्त करित एके विहिरी पा शी आले ती बहुत खोल होती तीचे कांठावर ब सून परस्पर विचार करित आहेत कीं ईत उ डी टाकावी कीं नये टाकुं-एक ह्मणतो टाकावी कांकीं खोल आहे ह्मणोन खाली पाण्याचे झरे पु ष्कळ असतील आणि कोणत्येही गोष्टीची अडच ण पडणारनाही-त्यास दुसरा उत्तर करितो रे तूं

ह्मणतोस

ह्मणतोस हें सर्व खरें असेल तथापि ही जोंवाव रखीगोष्ट आहे ह्मणून तुझे विश्वास माझानें र कार देववतनाहीं-अरकां या विहिरीतलें ही पा णी सुकलें असलें तर मग बरें आपण पुनःबाहेर कसे निघूं—

तात्पर्य

एकादे अवघड कामांत हात घालण्या आगो दर योजना करून ठेवीत जावी की कदाचित् तें फसलें असतां अमुक वाटेनें आपली निभावणी करूं—

---

गोष्ट—२०

बैल आणि बोकड

सिंहमागे लागला ह्मणून एकबैल जीव घेउन पळाला तो एके गुहेंत शिरूंलागला तेथें एक बो कड होता तो त्यास आंत जाऊं देईना ह्मणूं ला गला की हें माझें घर यांत तूं आलास तर तुला मारीन-बैलानें बहुत काकळुत केली की अरे भा

झे पाठीस सिंहलागला आहे या समई तुझे यह स्थ पणास योग्य आहे की मला आसरा द्यावा-ब करा ते कांहिकेल्या ऐकेना-शेवटीं समोर करून अं गावरच येतो-तेव्हां बैल त्यास ह्मणतो-रे मी तु ला अथवा तुझे शिंगास भीत नाहीं-कायकरूं जर यां यावेळेस माझे पाठीवर सिंह नसता तर बै लाचे आणि बोकडाचे योग्यतेमध्यें किति अंतर आहे याचा चमत्कार तुला आतांच दाखविला असता—

तात्पर्य

कोणी संकटामध्यें असतां त्यास साहित्य करणें हें मनुष्यपणास अयोग्य-मग साहित्य नकरून त्या स धिक्कार करणें अथवा उपद्रव करणें किंवा त्या चे दुःखावर डागदेणें यासारखा पाजीपणा दुस रा काय आहे—

गोष्ट—२१

मांजर आणि उंदिर

एके घरांत उंदिर फार झाले होते तेथें ए

क

क मांजर आलें त्याणें त्यांतील कांहीं खाउन उ भेकेले तें पाहुन एकेदिवशीं शेष राहिलेल्यांनीं एकत्र होउन निश्चयकेला कीं वरून खालीं कोण्ही उतरूनये-ते दिवसा पासोन मांजराचे हातीं उंदीर लागलेनाहीं तेव्हां उपाशींमरूंलागले असतां त्याणें एके खुंटीस अपले पाय अडकवून मेल्याचें सोंग धतलें-तें पाहुन वरून एक लातारा उंदिर त्यास ह्मणतो गड्या तूं खुशाल टांगुनधे-हें तर काय परंतु तुझें पोट चिरून आंत पेंढा भरलाआहे असा जरि तूला आह्मी पाहिला तथापि इतःपर तुझा विश्वास करणार नाहीं—

## तात्पर्य

घातकी कपटी ठक यांची गोडवचनें अथवा कर्में खरीं मानितात ह्मणूनच लोक ठकले जातात-एकवेळ त्यांचे स्वरूप दळखिलें आणि ते लुच्चे असा ज्याणीं मनांत दृढ निश्चयकेला त्यांस त्यां बापुड्यानी काय ठकवायाचें आहे—

गोष्ट—२२

कोला आणि कांटयाचेंझाउ

कोणी एक कोला कुत्रे पाठीस लागले ह्मणोन पव्याला तो एक वई उउत होता-त्या वईमध्यें एक कांटे झाउ होते त्यास त्याणें धरिलें असतां हातां पायांस कांटे रतून तेथें अउकला-तेव्हां तो त्या कांटे झाडाची निंदा करून ह्मणतो रेमहस्था तुझा आश्रय करायास मी आलों तें तूं मशीं असा निर्दयपणा करितेंस हें तुला योग्य नाहीं-कांटे झाउ उत्तर करितें रे तुं इछिलें होतेंस कीं त्वां मला झोंबावें आणि मी कांहीं बोलूंनये जें करिसील तें उगीच साहावें-तर आजा पासून हें बरें जाण कीं झोंवणें हा आमचाचहक ह्मणोन याउपरांत तूं कधींही कांटेझाडाचे वाटेस जाऊंनको—

तात्पर्य

दुर्जन आहेत ते दुसऱ्यास उपद्रव करायास जातात मग तो त्यांजहून सवाई असला ह्मणजे त्यांसच उलटा पेंचांत घालतो तेंव्हा ते त्याची निंदा

करूंलागतात आणि ह्मणतात-अहो या महस्थानें आह्मास असें करावें काय-हें यास उचित आहे-परंतु आपल्ये मनांत असें समजतनाहींत कीं निरपराधें लोकांस उपद्रव करणारे जे आह्मी त्या आमचा लोक प्राण घेत नाहींत हाच त्यांचा मोठा उपकार—

---

## गोष्ट—२६

### पारधी आणि पक्षी

कोणी एक पारधी पांखरें धरावयास जाळें बांधित होता तेथें जवळचे झाडावर एकपक्षी बसला होता त्याणें त्यास पुसिलें रे बावा हें काय करितोस-पारधी उत्तर करितो-हें तुझा पक्ष्यांस वसावयाकरितां नगर बांधितों आहें-यांत जे पक्षी येउन राहातील त्यांस कोणतेही गोष्टीची अडचण पडणार नाहीं-येथें चारा आहे-पाणी आहे-राहावयास नानाप्रकारचीं ठिकाणें आहेत-निजावयास मऊ आणि ऊबदेणारे असे बिछाने आहेत-

चांगल्या

चांगल्या चांगल्या क्रियाआहेत-पक्ष्यानें तें सर्वीव रें मानिलें आणि पारधी जाळें बांधून गेल्यानं तर त्यांत आला तो अडकून दुःखपावूंलागला तेव्हां तेथें पुष्कळ पक्षी आले त्यां सर्वांसि त्याणें सांगितलें-रे संभाळा-हा पाश आहे-येथें मी फसुन सांपडलों-तो पारधी तुह्मास मोटांत घालील तर तुह्मी त्याचें वचन खरें मानुनका आणि सर्वपक्षी मात्रास हें वर्तमान जाउन सांगा-दोहों चोहों घ टिकानी पुनः पारधी तेथें आला तेव्हां त्यास तो पक्षी ह्मणतो-रे ठका-तूं मलातर ठकविलेंस परं तु मनांत निश्चय समज की अतःपर तुझे या र म्यस्थळामध्यें दुसराकोणी पक्षी येणार नाहीं-

तात्पर्य

धूर्त आहेत त्यांची वळख पटली नाहीं पर्यंत ते लोकांस ठकवूं शकतात-एकवेळ त्यांचें स्वरूप उघड झालें ह्मणजे लोक त्यांचे पाशासही उभे रा हात नाहींत—

गोष्ट २४

गोष्ट—२४

सिंह आणि बेडुक

एक सिंह सरोवरावर पाणी पियावयास गेला होता तेथें बेडुकाची डरांकणी ऐकून दचकला आणि चोहोंकडे पाहून मनांत ह्मणतो रे येथें तर कोणी दृष्टीस पडत नाहीं आणि शब्द तर राहुन राहुन होतो हें काय असेल ह्मणून भयानें कांपुं लागला-परंतु तेथुन पळून नजातां धैर्य धरून विचार करितो आहे-इतक्यांत सरोवरांतुन ओरडत तोच बेडुक बाहेर निघाला तो पाहातांच सिंहास क्रोध आला की हा लाहान जीव असून याणे मजकारिल्यास इतकें व्याकुळ केलें-मग तसाच त्या बेडुका पाशीं गेला आणि त्यास पांयानें फाडुन टाकिलें—

तात्पर्य

भयाचीं कारणें बहुतकरून खोटीं असताहेत तीं जे अविवेकी-जे मूर्ख-त्यांसच उपद्रव करितात-जो विवेकी धैर्यवान आहे तो त्यांचें मूळ शोधि

त

स जातो तेव्हां त्याचे लक्षांत येते की आपले मना वांचून भयास दुसरें मूळ नाहीं—

---

## गोष्ट—२५

### सिंह आणि बकरा

एके सिंहानें एक बकरा डोंगराचे कड्यावर च रतां पाहिला तेव्हां तेथें आपली गती नाहीं जा णून त्यास ह्मणतो रे तूं असे अवघड ठिकाणी अ वघा दिवस चरतोस यांत तुला काय सुख आहे- टेणें मारतांमारतां एकादे वेळेस पडलास तर प्राणास मात्र मुकशील-मला हें बरें दिसतें की तूं खालीं यावेंस आणि या मैदानांत कोंवळेंकोंवळें गव त मधुरमधुर झाडांचीं पानें आहेत हीं खावींस-बो कड उत्तर करितो बाबा ह्मणतोस ती गोष्ट खरी परंतु तूं मला बुभुक्षितसा दिसतोआहेस ह्मणोन तूं आहेस त्याठिकाणीं मी येऊन आपला जीव धोक्यांत घालित नाहीं—

तात्पर्य

तात्पर्य

जो पुरूष बुभुक्षित-ज्यांस लोकांमध्यें प्रमाणिक पणा नाहीं-अश्यानी कांहीं आपल्ये हिताची गोष्ट सांगितली ती खरीशी वाटली तथापि त्यांजवर विश्वास ठेऊंनये-त्यांत कांहीं तरि कपट आहे असें जाणावें—

---

गोष्ट—२६

कोला आणि रानडुकर

कोणी एक रानडुकर झाडाचे बुंधावर आपली दाढ पाजवित होता तेथें एक कोला आला तो त्यास पुसतो रे तुजवर कोणी शत्रु चढुन आला असें तर कांहीं आशी पाशी दृष्टीस पडत नाहीं आणि उगाच दाढ पाजवितो आहेस याचें कारण काय तें सांग-डुकर उत्तर करितो-गड्या-खरीगोष्ट-पण तूं जाणतोस-फावले वेळेस आपले हत्यारास पाजवित असावें कांकी संकट समई अवकाश सांपडेल याचा काय भरंवसा—

तात्पर्य

## तात्पर्य

घरास आगलागल्यावर मग विहीर खणावया स निघणें हें मूर्खाचें कर्म-जोंव बाळपण आहे आ णि डोईवर वडिल आहेत-संसार अंगावर पड ला नाहीं-तोंव विद्याकरावी जेणें करून तरुणप णीं सुख होईल-तसेंच तरुणपणीं त्याविद्येचे अनु भव घ्यावे-इंद्रियें स्वाधीन करावीं-व्यसनापासोन आपणास राखावें-द्रव्याचा संचयकरावा-की जेणें करून म्हातारपण सुखानेंजाईल-असी योजणूक जो पूर्वी पाळून ठेवित असतो तोच सावधझाणा वा-तोच शाहाणा-तोच माणुस-आणि त्याणेंच बुद्धी चें सार्थक केलें असें जाणावें—

---

## गोष्ट—२७

## दोन खेंकडी

खेंकड्याचा स्वभाव आहेकी उलटें चालतअसा वें-कोणी एके दिवशीं एक खेंकडी आपल्ये लेंकी स रागें भरली की तूं ही सृष्टीनिराळी चाल टा

कमूल ह्मणत्ये

क-मल ह्मणत्ये आई-माझे बुद्धी प्रमाणे मला नीट दि सतें तें मी करित्यें तुझे मर्जीस जर तें येईना तर मी कसें चालावें तें तूं स्वयें चालून दाखिव मग तें पाहू मीही तशी चालेन—

तात्पर्य

ज्यागोष्टीविशीं दुसऱ्यास खोड ठेवितों तीच गोष्ट आपण स्वयें आचरितो याहुन दुसरें आश्चर्यकाय सांगावें-दुसऱ्यास उपदेश करतां सर्वांस येतो परंतु जो त्या उपदेशा प्रमाणे स्वयें वागतो तो शाहाणा ह्मणावा-चांगल्या चांगल्या गोष्टीमात्र सांगतो तो शाहाणा नव्हे—

गोष्ट—२८

चोर आणि पोर

एक पोर चोरास पाहून विहिरीवर रडत बसला-चोरानें त्यास पुसिलें-कां रडतोस-तेव्हां तो पोर स्फुंदोनस्फुंदोन ह्मणतो-माझें रुप्याचें भांडें दोरी तुटोन विहिरींत पडलें-आतां मी काय करूं-मला घरीं आईबाप मारितील-हें ऐकुन तत्क्षणीं

णी चोरानें आपलें गांठोडें व आंगावरील चिर
गुटें चिहिरीवर ठेविलीं आणि आंत उतरोन ब
हुतवेळ पर्यंत भांडें दुंढालित होता परंतु सांप
डलें नाहीं-मग निराश होउन वरती आला आ
णि पाहातो तवं मुलगा दृष्टीस पडला नाहीं-आ
णि गांठोडें व चिरगुटेंही नाहींत तीं तो पोर घे
उन पळून गेला--

तात्पर्य

चोर दुसऱ्यास नागवितो ह्मणोन त्याणे असें स
मजूनयेकीं मला कोणी नागविणार नाहीं--

---

गोष्ट--२९

चोर आणि कुतरा

कोणे एके मनुष्याचें घर फोडावें ह्मणोन रात्री
स चोर आला त्यासपाहुन दारी कुतरा होता तो
त्याचे आंगावर भुंकू लागला तेव्हां चोराने भाक
रीचा तुकडा त्याचे आंगावर उडविला तो नघेउ
न कुतरा त्यास ह्मणतो रे पहिल्याने मला संशय

मात्र

मात्र झालाहोता की इतके रात्रीस येथें आला आहेस ह्मणून तूं कोणी पाईट मनुष्य असशील-परंतु तूं लांच दिलांस आतां तें उचितजालें-तर मी दारापाशीं राहून माझे धन्याचें घर राखित असतों ह्मणून तूं याघराचे आशिं पाशी आहेस पर्यंत मी असाल भुंकेन यांत संशय धरूनको आपले वाटेने जाकसा—

तात्पर्य

कार्य साधक आहेत ते मूर्ख किंवा स्वार्थीयांस लांच देउन वश करूंशकतात परंतु जे थोर-प्रमाणिक-स्वामिभक्त आहेत ते लांच घेउन वश होत नाहींत—

---

गोष्ट—३०

डुकरी आणि कुतरी

एके समयीं डुकरी आणि कुतरी यांची गांठ पडली असतां लवकर कोणविल्ये ह्मणोन उभयतांचा वाद लागला तेंव्हां कुतरी बोलत्ये मी एकेर

के वेळेस पुष्कळ पिलें विल्यें आणि माझें वीण्यास फार महिनेही लागत नोहींत-डुकरी ह्मणल्ये गोतें खरें परंतु तुं वीण्याविशी दर खेपेस उतावीळ होत्येस ह्मणोनच तुझी पिलीं आंधळीं उपजतात-तसें मला होतनाहीं—

तात्पर्य

उतावळीने जें काम केलें तें कचें राहातें—

---

गोष्ट—३१

कोला आणि गांवढेकर

एके कोल्या मागें पारध्यानी फार लगट केली असतां तो धांवतां धांवतां थकला तेंव्हा वाटेवर गांवढेकरी उभा आहे पाहून त्याणें त्याची प्रार्थना केली की मला आपल्ये खोपटांत लिकुंदे गांवढेकरी ह्मणाला बरें-मग कोला त्याचे खोपटाचें कोनांत दडून राहिला असतां पारधी मागुनआले त्याणीं गांवढेकरी यास विचारिलें-तुं इकडुन कोणी कोला जांता पाहिलास-गांवढेकरी बोलिला-

नाहि-

नाहीं-असें तोंडानें बोलेमात्र परंतु कोला लिकाला होता तें ठिकाण बोटानें त्यांस वरचेवर दाखवित असे तों त्याची खुण नसमजतां ते पारधी जातेझाले तें गेल्या नंतर कोला हळुव तेथोन निघुन जावयास लागला तेसमयीं गांवढेकरी त्यास ह्मणतो अरे-ही च तुझीरीतकाय-ज्याणे तुझे प्राण वाचविले त्यास त्वां जातेसमयीं पुसलेंदेखील नाहीं-कोल्यानें त्याचे कृत्य फटींतून पाहिले होतें तें मनांत धरून उत्तर करितो गड्या तुझे बोलण्या प्रमाणें तुझें करणें जर असतें तर तुझा उपकार फेडायास मीं चुकलों नसतों—

तात्पर्य

कितीएक अधम असे आहेत कीं बाहेरून बोलण्यांत मोठे आप्त असें दाखवितात आणि आंतून नाशकरायाचा उद्योग करीत असतात-उघड वैरी असेल तो बरा-परंतु मित्राचे सोंगानें आंतून शत्रूचें कर्म आचरितो तो हितशत्रू विश्वासघातकी फार नीच त्याचें तोंड पाहूंनये—

गोष्ट—३२

गोष्ट—३२

मनुष्य ज्यास कुत्राउसला होता

एके मनुष्यास कुत्रा ऊसला त्यास एके ज्ञाता रौने ऊपाय सांगीतला कीं भाकरीचा तुकडा घे उन घायावर लाव मगतो तुकडा त्या कुत्र्यास खाविव ह्मणजे वीष उतरेल-तो मनुष्य त्या प्रमाणे करितो आहे इतक्यांत एक शाहणा त्या वाटेने जात होता त्याणें त्यास पुसिलें-अरे हें तूं काय करितो आहेस-तेव्हां घायाळानें कचें वर्तमान सांगीतलें-तें ऐकुन शाहाणा ह्मणतो रेरे जर असें आहे तर भी तुज पाशी मागूनघेतों कीं हें तुं कार चोरून कर-जरकां हें वर्तमान या शहरचे कुत्र्यांस समजलें तर एक मनुष्य जखमे वांचून राहूं देणार नाहींत—

तात्पर्य

चोरास पारिपत्यच योग्य तें नकरून जो पुरुष त्यास भिऊन त्याची ऊलटी सेवा करितो त्या

णें

णें ती गुप्त तरी करावी नाहींतर सावांची शोभा राहाणार नाही आणी चोरांचेंच माहात्म्य वाढेल—

---

गोष्ट—३३

दैव आणि मुलगा

एक मुलगा विहिरीचे कांठावर निजलाहोता तें पाहून दैवानें त्यास जागें केलें आणि बोलिलें रे जरकां तूं विहिरींत पडलास तर लोक मुझा अन्याय असें ह्मणणार नाहींत मला शब्द ठेवितील—

तात्पर्य

सर्वलोकांची होचरीत आहे कीं एकादी गोष्ट चांगली झाली तर ह्मणतात कीं आह्मी केली आणि घाईट झाली असतां दैवास दोष ठेवितात-परंतु आपल्ये करणीस शब्द लावीत नाहींत—

## गोष्ट—३४

### लोभी मनुष्य

कोणी एक लोभी मनुष्यानें पयसा सांचवून शे
तांत पुरून ठविला तेथें नित्य एक दोनवेळ त्या
णें जातअसावें आणि पयसा पुरलेलें ठिकाणपाहुन
मनांत संतोष पावत असावें-में त्याचें कृत्य चाकरा
नें लक्षांत आणून त्यावर तर्क बांधिला कीं आप
ला धनी या जागेकडे नित्यनित्य पाहातो तस्मा
त् येथें कांहीं विशेष आहे-मग त्याणें रात्रीस ये
ऊन जागा खणून पाहिली तंव आंत ठेवा सांप
डला तो घेऊन पळून गेला-दुसरे दिवशीं लोभी
मनुष्य नित्याप्रमाणे तेथें येऊन पाहों लागला तंव
ठेवा गेला हें समजून त्याणें डोईंत धूळ घातली ऊ
र बडवुं लागला आणि हाय हाय करून रडत ब
सला तो घरी जाईना-शेवटीं त्याचा शेजारी त्या
पाशीं तेथें आला त्याणें वर्तमान पुसिलें त्यास लो
भ्यानें सर्व सांगितलें तें ऐकून शेजारी ह्मणतो रे
बाबा-मला असें वाटतें कीं तुझें कांहीं गेलें नाहीं

तूं आपल्ये चित्तांत पयसा गेला असें नआणि तां, या खांचेकडे नित्य पाहातहोतास तसाच पा हातजा, ह्मणजे तुझें काम झालें.

तात्पर्य

लोभी आहेत ते पयसा असून दरिद्री-ते अ सने द्रव्याचा उपभोग नकरून आणिक मिळवा वयाचे लालचेनें, मरेपर्यंत अनेक प्रकारची पात कें निरंतर करितअसतात. शेवटीं त्यांचा पै का चोरपोर खाउनजातात: त्यांचे वांट्यास दुः ख, शोक, आणि मेल्याअंती अक्षय नरक, इतकें मात्र येतें.



गोष्ट—३५

करकरत्ये चाकाची

एक सारथी, रथ हांकित होता, त्यारथाचें ए क चाक फार करकरूं लागलें, तें पाहून तो वि स्मित

स्मित जाहाला आणि चाकास पुसत्ये,"रे, दुसरी चाकें करकरत नाहींत आणि तूचकां करकर तेंस" तें बोलिलें, "मला फार दुःख होतें तें माझानें साहावत नाहीं ह्मणोन रडुंयेतें."

## तात्पर्य

दुःखास पिडुन जो लोकांस दीनता दाखवितनाहीं, तो धैर्यवान् समजून लोक त्यावर अधिक प्रीति करितात - आणि जो हायहाय करून दैन्य भाकितो तो लोकांपासून साहित्य नपावून आपला हलकेपणा मात्र त्यांचे दृष्टीस आणितो.

---

## गोष्ट—३६

## शाहाणा सिंह

कोणे एका सिंहानें सावजास मारिलें, आणि त्यास खाणार तों, त्या वाटेनें एक चोर जातहोता तो पुढें येउन त्यास ह्मणतो, "सिंहा, तुझी मर्शी अ

धीं

धोंअर्ध" सिंह बोलला, "अरे धट्टा, एथें तुझा कांहीं संबंध नसतां, निलाजरा होउन भाग मागायास आला आहेस; तर उगाच आपल्ये मार्गानें जा, ना हींतर मारला जाशील." मग तो चोर ओशाळून चालताझाला. तितक्यांत त्या मार्गानें कोणीएक भलामनुष्य जातहोता, त्याणें सिंहास पाहिलें, आणि तो भिउावून ती वाट सोडून पलीकडचे वाटेनें जाउंलागला; तेव्हां सिंह त्यास आदरानें हाकमारुन ह्मणतो, "अरे भिउं नकोरे भिउं नको, तूं भला मनुष्य आहेस, ह्मणोन यांतील विभाग तुला योग्य आहे; तर बे आतां हें सावज आपण दोघे वांटून खाउं" असें बोलून सिंहानें त्या सावजाचे दोन भाग केले; त्यांतील एक भाग त्या भल्या मनुष्या करितां ठेविला, आणि दुसरा आपण भक्षून रानांत गेला.

तात्पर्य

शाहाणे मनुष्यास हें योग्य आहेकी, जो भिउस्त

स्त, जो भला, जोगुणी, त्यास जवळकरावें; आणि जे गळींपडून मागणारे, गोडबोले, चाहाड, बहुभाष, दांडगे, अशा मनुष्यांस आश्रय देउंनये, जो मनुष्य अधिकारावर आहे त्याणेंतर, गुणी मनुष्यें मेळवाया विषयीं फारच यत्न करित असावें.

---

गोष्ट—३७

लांडगे आणि दुखणाईत गाढवी.

एक गाढवी दुखण्यांत पडली होती, ती अत्यावस्थ आहे अशी आवाई उठली, ती ऐकून दोघे चोघे लांडगे तिचे समाचारास आले; ते गोठ्याचे दाराशीं ओंकावून हळुव विचारितात, "बाईची प्रकृती कशी आहे?" तें ऐकून तिचा पुत्र आंतून बाहेर आला, त्याणें उत्तर केलें कीं, आपण बाईची प्रकृती जशी ईछितां, तशी अद्यापि नाहीं".

तात्पर्य

तात्पर्य

दुखणाइताचे समाचारास जे येतात, त्यांत के वळ ममतेनें येणारे असे थोडे; आप आपले अ र्थाविर येणारे असे फार.

---

गोष्ट—३८

लांडगा आणि करडू

एक बकरी बाहेर चरायास जाऊंलागली, ते समयीं तिणें आपले करडास सांगीतलें, "अरे आं तुन कवाडास खीळ घाल ती मी संध्याकाळीं प रत येई पर्यंत दुसरे कोणास उघडूं नको. तेथे जवळच एक लांडगा होता, तो, तें ऐकून, बकरी निघून गेल्यावर किति एक वेळ जाऊं देऊन, कवाड ठोठावूं लागला; आणि तिचे सारिखा श ब्द काढुन, "मुला दाराची खीळ काढ" ह्मणून बो लला. करडानें आईची आज्ञा लक्षांत आणून खि

उकी

उकीलून पाहिलें तों, कपट दृष्टीस पडलें; तेव्हां तें लांडग्यास ह्मणतें, "अरे तूं आपले मार्गानें जा; तूं बकऱ्याचे शब्दा सारिखा शब्द काढितोस ख रा, परंतु तुझा आकार लांडग्याचा दिसतो, ह्मणो न मी तुला दार उघडीत नाहीं."

तात्पर्य

जीं मुलें आईबापांच्या आज्ञा लक्षांत ठेवितात; त्यांचे सांगितल्या प्रमाणें चालतात; तीं संकटांत पडत नाहींत. वडिलांचे सांगण्यावर विश्वास ध रावा, याचें मोठें कारण हेंच कीं, तीं आपल्या मु लांचें वाईट कदापि इच्छित नाहींत; कां? जें मुलां चें वाईट तें त्यांचेंच वाईट. दुसरें कीं, तीं वया नें वडील ह्मणोन त्यांस मुलांपेक्षां बरेंवाईट अधि क समजतें; अशीं जीं आईबापें, त्यांचें जीं मुलें ऐकत नाहींत, त्या मुलांचें कल्याण कदापिहोत नाहीं.

गोष्ट

## गोष्ट—३९

### मुंग्या आणि टोळ

उन्हाळ्या मध्यें, कोणे एके समयीं, मुंग्या, आपल्ये बिळाजवळ दाण्याच्या राशी घालून उनांत सुकवायाच्या उद्योगांत होत्या, इतक्यांत भुकेनें व्याकुळ असा एक टोळ तेथें आला; तो दीनवाणें तोंड करून याचना करूं लागला कीं, "बायानों, एकतरि तांदुळांचा दाणा देउन माझा प्राण बांचवा, तुह्मास फार पुण्य लागेल"- ते समयीं त्यांतील एक मुंगी त्यास विचारत्ये "अरे सुगीमध्यें आह्मी दाण्याचा संग्रह केला तसा त्वां कां केला नाहीं?" तो बोलला, "सुगीमध्यें माझा काळ, खातां, पितां, नाचतां आणि आनंद करितां गेला, तेवेळीं पुढची कल्पना एक वेळही माझे मनांत आली नाहीं. तें ऐकून ती ह्मणाली, "बाबा, असें आहे तर, जे पुढची सोय नपाहातां खातात, पितात, आणि

आणि आनंदकरितात ते, शेवटीं उपाशीं मरता त त्यास कोणीं काय करावें ?"

तात्पर्य

तरुणपणीं जो सावध होउन द्रव्य जोडून ठेवि तो, तो पुढें म्हातारपणीं दुःख पावत नाहीं, हें प्र त्यक्ष पाहूनही किति एक आहेत ते, तरुणपणी च मेळवितात तितकें उधळून टाकतात, तर ते, आपल्ये मनांत काय समजतात? त्यांचे हातपाय रा हातील तेव्हां त्यांस पाहिजेत त्या वस्तू आका शांतून पडतील काय? जरी लेंक, भाउ, किंवा दु सरे सोयरे याणीं, आपल्यास म्हातारपणीं पोशि लें, तरी तें धर्माचें; त्यांतही, ते लेंक आदिकरून आपले जवळ राहातील, आणि वडिल म्हणोन भ क्तीनें आपली सेवा करितील, याचें तरी प्रमाण काय? म्हणोन, आपले जवळ द्रव्य असलें तर म्हाता रपणीं उपयोगी पडेल, याकरितां तरुणपणींच जोडून ठेविलेंपाहिजे,

गोष्ट

गोष्ट—४८

## लेंक आणि आई

एक मुलगा, साळेंत लिहावयास जातअ सें; त्याणें एके दिवशीं एका मुलाची वस्त चोरली, आणि ती आपल्यें आईजवळ आणूनदिली. तिणें मुलास शिक्षा करावी ती न करून, उलटी त्याची प्रशंसा केली, आणि त्यास एक पैरू खाऊ दिला. त्यावरून, मग तो मुलगा वाढत गेलातसा मोटमोटाल्या चोऱ्या करूं लागला. कोणे एके समयीं तो चोरीत सांपडला असतां, त्यास सुळी द्यावयास नेलें; तें कौतुक पाहावयाकरितां लोकांचा थाट मिळालाहोता, तेथें त्याची आईही येउन स्फुंदस्फुंदोन रडतहोती; तीस पाहून तो राज पुरुषांस ह्मणतो, "दादोहो, एक वेळ या समयीं, त्या-माझे आईची आणि माझी भेट करा" तें ऐकून त्यांस दया आली; आणि त्याणी तीस जवळ बोलाविलें; तेवेळी रागानें त्याणें तिचे का

नास

भास चावा घेतला-तें पाहून लोक ह्मणूं लागले "कीं थहो द्वाड हा; पाहा पाहा, हा मुळीं चावयाचे वे ळेसही, हें महापातक करायास चुकला नाहीं!" तें ऐकून त्याणें उत्तर केलें, "सज्जनहो, माझा विनंती ऐका-मी था आईचा या समयीं प्राणही जरीघे तला असता, तरीमला दोष लागता ना; असें कां ह्म णाल तर, मी मुळीं लाहान असतां, साळेंतील ए का मुलाची वस्त चोरून हीजवळ आणून दिला होता; तेव्हांच जर हिणें माझें पारिपत्य केलेंअ सतें, आणि पेरू दिला नसता, तर आज ही द शा मला कां प्राप्त होती"?

## तात्पर्य

जीं मुलें मूढ होतात, अथवा द्वाड होतात, त्यां स, बहुत करून आईबापाचे लाड कारण होत. ओले मडक्याचा कांठ जसा लवविला तसा लव तो; तशीच बाळकाची बुद्धी, लाहानपणी ज्या मा र्गास लाविली तो मार्ग सोडीत नाहीं- या सा ठीं

ठी, आई, बाप, अथवा मुलाचे जे वडील असती ल त्याणीं, तो लाहान असतांच त्यास चांगल्या मार्गी लावण्याविषयीं आळस करूं नये; कां कि मोटा झाल्यावर त्याचा दुर्गुण लक्षावधी रुपये खर्च केल्यानेंही जाणार नाहीं; मग तो जें जें पातक करील त्याचा झाडा, देवापाशीं, त्याचे वडिलांस द्यायाचा पडेल.



गोष्ट—४१

आस्वल आणि मधीचीं पोळें

एक आस्वल एक कुपण उडोन आंत गेला; आणि तेथें मधीचीं पोळें लागलीं होतीं तीं फोडून, त्यांतील मध खाऊंलागला; त्याचा सूड घ्यावा ह्मणोन, अवघ्या माशा त्याजवर एकदांच तुटून पडल्या; परंतु त्याचे अंगाची कातडी जाड ह्मणोन, त्यास कांहींच बथा होईना. तेव्हां त्याणीं त्याचे नाकाकानांस उपद्रव केला; मग त्या वेदनेनें

नेनें पिसाळून त्याणें, आपल्या नखानीं आपल्यें कानाचें कातडें तोडतोडुन घेतलें: असें त्याचे अपराधास त्याचेच हातून पारिपत्य झालें.

तात्पर्य

पर पीडा करणारास कोणत्याही वाटेनें पारिपत्य होतें.

गोष्ट—४२

बोका आणि कोंबडा

एके समयीं, बोक्याचे मनांत आलें कीं, कोंबड्यास मारून भोजन करावें; मग त्याणें जपणीस लागून एके पाहांटेस त्यास अवचित धरिलें, ते समयीं कोंबडा त्यास ह्मणतो "अरे अरे, माझा जीव घेऊंनको" बोक्यानें विचारलें, "कां?" तो उत्तर करितो, "अरे, लोकांस माझा उपयोग फार आहे; मी प्रातःकाळीं आरडतों तेणेंकरून सर्व साधध

बध होतात; आणि आपआपल्या धंद्यास लाग
तात." बोका बोलला, "ह्मणोनच मी तुला मारणार.
जो तूं कर्कश शब्द करून नित्य माणसांची नीज मो
डणारा, त्या तुला मारावें हेंच योग्य आहे. दुस
रें; तूं आई बहिणीकडेही जावयास मागें पुढें पा
हात नाहींस." कोंबडा ह्मणतो, "अरे, माझे धण्यास
अंडीं आणि पिलीं पाहिजेत, ह्मणोन मी तें क
र्म करितों; आणि तो आमचा स्वभावही होय."
ते समयीं बोका रागें भरून बोलला, "अरें दुष्टा,
आतां पुरे करून आपली जीभ आटोप, तुझेसा
रिखा दुष्कर्मी वांचावयास योग्य नाहीं, हेंच खरें."

तात्पर्य

दुष्ट मनुष्य अधिकारावर आहे तर, तो आप
ला मनोभाव सिद्धीस नेतोच; त्यापुढें आपला गु
णीपणा, किंवा निरपराधीपणा, आपल्यास रक्षूं
शकत नाहीं. अशा पुरुषास पापाचें भय दाखवून
ही फळ नाहीं; त्याचें मन दोष करितां करितां क

ठिण

ठिण झालें असतें तें पातकास भीत नाहीं. ह्मणो न यत्न चालेल तर, असले दुष्टास अधिकारावरू न काढायाचा उपाय करावा.

---

## गोष्ट—४३

### गवताचे गंजीवरील कुतरा

एक कुतरा, गवताचे गंजीवर बसला होता, तेथें एक भुकेला बैल गवत खावयास आला, तें न साहून तो त्याजवर भुकूं लागला. तेव्हां बैल त्यास धिक्कारून ह्मणतो, "अरे कुसक्या प्राण्या, हें गवत तूंही खात नाहीस; आणि दुसऱ्यासही खा ऊं देत नाहीस, असा जो तूं दुष्ट, त्या तुला सदां विपत्ती असोत."

### तात्पर्य

मत्सरा सारिखा दुसरा वाउ विकार नाहीं. का म क्रोधादिक जे इतर मनोविकार आहेत ते

कांहींवेळ

कांहींवेळ राहून शांत होतात; परंतु हा कधींही शांत होतनाहीं, अधिकाधिक वाढतच जातो; आणि जंवजंव वाढतो तंवतंव, अधिकाधिक संतापच करितो; कांकिं दुसऱ्याची विद्या, धन, प्रतिष्ठा, पाहून तें सर्व आपणास असावें, आणि त्यास नसावें, अशा वासना ज्याहोतात, त्या कधीं पूर्ण व्हाव्या? आणि मत्सऱ्यास सुख कधीं पडावें? ह्मणोन मत्सरी निरंतर दुःखितच राहातो.

---

गोष्ट—४४

कुतरा आणि मेंढा

एक कुतऱ्यानें, मेंढयावर रिणाची फिर्याद केली, तिचे निवाड्यास लांडगा आणि गीध हे पंच झाले; त्यांणी कुतऱ्याकडून साक्षी प्रमाण कांहींच न घेतां, मेंढयास अन्यायी ठरविलें. तो निवाडा होतांच, कुतऱ्यानें मेंढयाचा प्राण घेतला; आणि त्या

चें

चें मास ते अधार्मिक पंच, व आपण मिळून वां
टून खाल्लें.

## तात्पर्य

चोर, लबाड, ठक, घातकी, यांपासून पीडा पावू
न लोक पंचांपाशीं येतात; त्यां पंचांनीच, लांचाक
रितां अथवा वाद्याचे भिडेनें, त्यांचा घात करणें
हें, महा महा, पातक होय. जो पापी पंच असल्या
पीडितांची हाय हाय घेतो, त्याचें बरें कधीं होत
नाहीं. लांच घेडुन दुसऱ्याचा घात करितो त्याणें तो
लांच नव्हे, विष घेतलें; तें त्याचें निसंतान करील.
आणि ज्या राज्यांत अशाचें पारिपत्य होत ना
हीं, तें राज्य निष्कंटक आहे तरी, लवकरच ल
यास जाईल. न्याय आहे तरच विश्वाची मांडणी
आहे, त्यासच जो हाणूं पाहातो, तो मूर्ख आपल्या
स हाणितो असें समजावें.

## गोष्ट—४५

### करडूं आणि लांडगा

एक करडूं खोपटावर चढलें होतें; त्या खोपटाखालीं एक लांडगा उभा होता; त्यास पाहून तें शिव्या गाळी देऊं लागलें. तेव्हां तो लांडगा त्यास ह्मणतो, "रे नीचा, रे तुझें हें बोलणें मला जाचीत असेल, असें तूं आपले मनांत समजूं नको; मी जाणतों कीं, हें दुर्भाषण तूं करीत नाहींस; ज्या खोपटानें तुला आसरा दिला आहे तीं खोपटी करित्ये.

### तात्पर्य

शिव्या भाषण, किंवा निंदा जो करितो; तो मनुष्य आपला हलकेपणा मात्र उघडा करितो; आस्र्याचे बळानें, एकादे वेळेस दुर्भाषण करणारास प्रत्यक्ष दंड होत नाहीं, ह्मणोन त्याणें आपण मोठा असें मनांत आणूं नये; त्याचे शरीरास प्रत्यक्ष

दंड

दंड झाला नाहीं खरा, परंतु प्रतिष्ठेस धक्का बसला, तें काय पारिपत्य नव्हे? ह्मणोन, जो कोणी असल्या हलके मनुष्यापासून अपमान पावला त्याणें, आपले जिवास संताप करूं नये; विचार करावा कीं तें अपमान करणाराचें सामर्थ्य नव्हे; ज्या आश्रयानें तो आहे त्या आश्रयाचें सामर्थ्य. तसेंच जो कोणी आपले पाठीमागें आपली निंदा करितो, ती ऐकून संताप पावूं नये; समजावें कीं, तो पाजी मनुष्य, तोंडावर बोलायास भितो, ह्मणोन पाठीमागें बोलतो.

---

गोष्ट—४६

कोल्हा आणि सिंह

एका कोल्ह्यानें पहिल्यानेंच सिंहास पाहिलें, तेव्हां तो भयाभीत होऊन त्याचे पायीं पडला, आणि केवळ दीनवाणीनें भाषण करूं लागला. दुसरे गांठीस तोच अवसान धरून त्याचे तोंडाकडे

पाहून

पाहून बोलूं लागला, आणि तिसरे वेळेस तर, जवळ जाउन त्याशीं सलगी करूं लागला.

## तात्पर्य

आपणाहून थोर आहेत त्यांशीं वर्त्तणूक करण्याच्या, कोल्ह्याचे आचरणांत ज्या दोन रीती दिसल्या, तशा नसाव्या: एक, भय पावोन केवळ दीनपणा दाखविणें; दुसरी, मर्यादा सोडून बरोबरीचे नात्यानें वागणें. तर, भयानें नघाबरतां, अथवा धिटाईनें बरोबरी नकरितां, आपला भार राखून मर्यादेनें थोरांशीं वर्त्तणूक करावी.

---

## गोष्ट—४७

## हंस आणि बगळे

एके शेतास हंस आणि बगळे नित्य उपद्रव करीत असत. एके दिशीं शेताचा धणी जपणास लागून चाकरां सहवर्त्तमान अकस्मात् त्यांजवर

तुटून

सुटून पडला; तेसमयीं, आंगानें पुष्ट आणि जड ह्मणोन, बहुतेक हंस मारले गेले, आणि बगळे सु ळसुळीत आंगाचे ते सत्वर उडोन गेले.

तात्पर्य

शत्रु मागें लागला असतां, निर्धनापेक्षां धनिक फार दुःख पावतो. सेनेचे ह्मटलें, जसें तळावर मा त्र सुखदायक एरवीं ओझें, तसें द्रव्यहि, संकट स मयीं संभाळून नेणें फार कठिण आहे.



गोष्ट—४८

पारवा आणि मुंगी

एक तान्हेली मुंगी वोहळावर पाणी पियाव यास गेली होती, ती ओघांत सांपडोन वाहून जा ऊं लागली. तें एक पारव्यानें पाहिलें, आणि त्या स दया येऊन, त्याणें आपले चोंचीनें एक झाडाचें

पान

पान तोडून पाण्यांत टाकिलें, त्याचा आसरा क
रून ती कडेस लागली. पुढें एके दिवसीं, अशी गो
ष्ट झाली कीं, तोच पारवा, एके ठायीं बसला हो
ता, त्यास समजूं नदेतां, पारधी जाळें घालीत हो
ता, तें त्या मुंगीस कळतांच, तिणें जाउन त्याचे
पायास दंश केला, त्या वेदनेनें त्याणें अकस्मात्
हात पाय झाडले, तें पाहून पारवा सावध झाला
आणि उडून गेला.

तात्पर्य

उपकारास प्रत्युपकार करावा हा मनुष्याचा सा
हजिक धर्म होय. तो केला ह्मणून कोणी आपल्या
स प्रशंसा इछील तर, त्याणें, आपले बापाचा प्रा
ण घेतला नाहीं, अथवा शेजाऱ्याचें घर पेटविलें ना
हीं, ह्मणोनही प्रशंसा इछावी. उपकारास प्रत्युपका
र केलाअसतां आपण त्यांत कांहीं विशेष केलें असें
नाहीं; मग जो प्रत्युपकार नकरितां, आणि दुसऱ्या
चा उपकार लक्षांतही नवागवितां, त्यास अपकार

करायास

करायास प्रवर्तती, त्याचा नीचपणा किति वर्णावा? या मुंगी पारव्यांच्या गोष्टीत मुख्यत्वेंकरून ही नीति सूचविली की, प्रत्युपकाराची इच्छा न धरितां उपकार करीत असावा, जसा पारव्यानें मुंगीवर केला; असा उपकार करायाची ज्यास आवड, तो केवळ ईश्वरी पुरुष ह्मणावा. ह्मटलें आहे; "दुसऱ्यापासून घेणें ही मानुषी प्रकृती, आणि फळाची अपेक्षा नधरितां दुसऱ्यास देणें, ही दैवी प्रकृती होय."



## गोष्ट—४९

एके पारध्यानें जाळ्यामध्यें एक पक्षी धरला, तो त्यास ह्मणतो, "अरे, जर तूं मला या समयीं जीवदान देशील, तर मी दुसरे पुष्कळ पक्ष्यांस फसवून, तुझे जाळ्यांत आणीन." पारधी उत्तर करितो; "अरे दुष्टा, तुला सोडूं नये इतकेंच मी पूर्वी योजिलें होतें, आतां या तुझे भाषणावरून, तुला जिवें मारावें असा माझा निश्चय झाला; कीं जो तूं

आपले

आपले एकटयाचे जीवा करितां, इष्ट, मित्र, ज्ञाती चा घात करणारा, त्या तुला वधच योग्य आहे"

तात्पर्य

राजद्रोहपातकी असतो तो, आपले इष्ट मित्र ज्ञातीच्या घातानें, शत्रूस आर्जवून, आपण सुखी होउं पाहातो; परंतु तोच शत्रू, आपलें कार्य झालें ह्मणजे, मग त्याला जीवंत ठेवीत नाहीं; कदाचित् ठेविला, तर मनांतून त्याचा वीट तरी करितो.

---

गोष्ट—५०

गरुडपक्षी आणि कावळा

एके पर्वताखालीं मेंढयांचा कळप चरत होता, त्या पर्वताचे माथ्यावर एक गरुडपक्षी बसला होता त्याणें त्यावर झेंप घातली, आणि त्यांतील एके मेंढयाचे पाठीवर बसून, त्यास आपले पायां चे गवींत धरून अंतराळीं नेलें. तें त्याचें संधान

पाहून

पाहून, एक कावळा कळंबाचे झाडावर बसला हो ता, तोही तसें करायास गेला; तेसमयीं, त्याचे पाय मेंढयाचे लोंकरींत अडकले आणि तो आरडुं ला गला; तो शब्द ऐकून, मेंढे राख्या जवळच होता त्याणें धांवून त्यास धरिलें, आणि त्याचे पायांस दोरी बांधून तो आपले मुलांस खेळायास दिला.

तात्पर्य

दुसऱ्याचे गुणाचा अनुकार करणें तर, पूर्वीं आ पली शक्ती, आणि स्थिती, यांचा विचार करून क रावा; नाहींतर तोच दुःख कारक होतो.



गोष्ट—५१

लोभी आणि मत्सरी

एके समयीं, लोभी आणि मत्सरी हे दोघे जण देवीचे देवळांत तप करीत होते. त्यांस देवी प्र सन्न होऊन बोलली; "रे, मागाल तो वर देत्यें, प रंतु

रंतु तो असे देईन कीं, जो आधीं, जें, जितकें मा गेल, त्याचें दुपट, तेंच, दुसऱ्यास प्राप्त होईल." तें ऐकून लोभी विचार करितो कीं, आपण आधीं मागूं नये; कांकिं, जसा मला लोभ आहे तसा या सही आहे; तस्मात् हा पुष्कळ धन मागेलच; मग मला त्याचें दुपट सहज मिळेल. असा निश्चय क रून तो उगाच राहिला; तें समजून मत्सऱ्यानें दे वीची प्रार्थना केली, "हे देवी, जर तूं प्रसन्न झाली आहेस तर, माझा एक डोळा फोड." मग देवीनें "तसें होउ," ह्मणतांच मत्सऱ्याचा एक, आणि लोभ्या चे दोन्ही डोळे फुटले.

## तात्पर्य

लोभ आणि मत्सर, हे दुर्गुण किति वाईट आ हेत हें या गोष्टीत स्पष्ट होतें. लोभी, अधिक द्रव्या च्या आशेस्तव, आपलें अभीष्ट देवीपाशीं मागून सु खी झाला नाहीं; आणि मत्सऱ्यानें दुसऱ्यास सुख

होउं

होउं नये ह्मणोन, आपला डोळा फोडून आपल्या जिवास दुःख करून घेतलें.

---

गोष्ट—५२

घोडा आणि गाढव

एके शिलेदाराचा घोडा, जरतारी जीन लेऊन लगाम चावीत, फुरतफुरत, वाटेनें जात होता; त्याणें, वाटेमध्यें, ओझ्यानें दडपून हळू हळू चालतो आहे असा, एक गाढव पाहिला; त्यास तो धमकी देऊन ह्मणतो, "अरे, पैस पैस, पैस नहोशील तर मी तुला आतां पायांखालीं तुडवून टाकीन." गाढव बापुडा निर्बळ, भीऊन आपला परिणाम लागणार नाहीं असें समजून, घाई घाईनें एकीकडे सरला. कांहींकां दिवसांनीं अशी गोष्ट झाली कीं, तोच घोडा, लढाईमध्यें गोळी लागून निकामी झाला, तेव्हां शिलेदारानें त्याला एका भाडेकऱ्यास विकिलें, मगतो ओझीं वाहूं लागला. एके समयीं

मर्यी तो पाठीवर मोठी कंठाळ घेउन मार्गांत जा
तो आहे, तें त्या गाढवानें पाहिलें, आणि त्यास
हाक मारून ह्मणतो, "राम राम हो राव राम राम,
ते दिवशीं मला पायां खालीं तुडविणार होतां ते
गृहस्त आपणच नव्हे? मी तेव्हांच भविष्य केलें हो
तें, कीं एकादे दिवशीं तरी आपला गर्व उतरला
जाईल.

## तात्पर्य

जोपुरुष अहंकारानें थोरपणा मिळवायास जा
तो, तो बळवान् अथवा थोराचा आश्रित आहे पर्यंत,
लोक त्यांस बाहेरून नमतात; परंतु अंतर्यामीं त्याचा
द्वेष करितात; तोच मग काळचक्र फिरून निर्बळ
झाला ह्मणजे, त्याची दया नकरितां हेळणा करि
तात. यासाठीं, थोरपणा मेळवायाची वाट ही न
व्हे; ती अशी आहे कीं, ज्यांस थोरपणा मनापा
सून नको असतो, त्यांचे तो पाठीस लागतो, आ
णि ज्यांस व्हावा, त्यांपासून दूर पळतो. जो पुरु
ष

षें मान मागतो, त्यास तो प्राप्त होत नाहीं. जो स्तुतीची इच्छा करितो, त्यास निंदा प्राप्त होत्ये. जो नम्र, जो निगर्वी, तोच थोरीस चढतो.



गोष्ट—५३

साळु आणि सर्प

एके साळूनें सर्पांची प्रार्थना केली कीं, "मला आपले बिळांत जागा द्यावी;" सर्पांनीं विचार नकरितां तीस ये ह्मटलें. ती त्यांचे बिळांत शिरली, ते वेळीं, तिचीं तो कांट्या सारिखीं तीक्ष्ण पिसें आंगास रुतोन, सर्पांस फार क्लेश झाले. मग ते तीस ह्मणूं लागले, "साळुबाई, आतां तुह्मी एथून जावें; आमच्यानें तुमचा उपद्रव साहवत नाहीं." तिणें उत्तर केलें, "मी कां जाईन? मला तर हें ठिकाण फार आवडलें; ज्यांस आवडत नसेल, त्यांणीं या ठिकाणाहून जावें."

तात्पर्य

तात्पर्य

कितिएक पुरुष स्वभावेंकरून असे वाईट असतात, कीं त्यांचे संगतीनें शीणच व्हावा. यासाठीं कोणाशीही मैत्री अथवा उदीम अथवा सोयरीक करणें तर, पूर्वी त्याची जाति, गुण आणि रीत रीत, हीं मोटे चौकशीनें पाहावीं; कांकीं एकवेळ गांठ पडल्यावर मग जर त्याशीं आपणाशीं बनलें नाहीं, तर मोठा पस्तावा होतो.

गोष्ट—५४

पारधी आणि पारवा

एक पारधी, बंदुक घेउन रानांत मृगयेस गेला होता, तेथें तो एक झाडावर पारवा बसला होता त्याजवर लक्ष योजून, बंदुकीचा चाप ओढितो आहे इतक्यांत, त्याचे पायांस सापानें दंश केला; त्या वेदनेनें व्याकुळ होतांच हातची बंदुक सुटून

खालीं

खालीं पडली, आणि सर्वांगांत विखार भेदला. त्याचा प्राण जाऊं लागला तेवेळीं, तो आपल्याशीं ह्मणतो, " रेकर्मी, मला जें हें शासन झालें तें यथा योग्य झालें: जो मी दुसऱ्याचा प्राण घेणार होतों, त्या माझा प्राणांत झाला, हा न्यायच झाला."

तात्पर्य

दुसऱ्यास पीडा करणारा स्वयें पीडा पावतो. पाहा पाहा आश्चर्य! परपीडा करणारा, आपलें मन कठोर करून लोकांस सहस्रशः उपद्रव करितो; त्यांतील एक जर प्राप्त झाला तर त्यास असें वाटतें कीं, हाय हाय! आतां काय करूं? कसें करूं? मी सुकुमार, हा उपद्रव कसा सोसूं? परंतु जसें आपल्यास दुःख होतें असेंच दुसऱ्यास होत असेल, हें त्या मुर्खांचे मनांत येत नाहीं. यासाठीं लोकांशीं वर्तणूक करित्येवेळे आपल्या चित्तास विचार पुसावा, ह्मणजे तें जी नीत असेल तीच सांगेल; तसें चाललें असतां मग धोका नाहीं. तें नकरितां, डोळे मिटून

न आपण काम क्रोधादिकांस वश होउन कुकर्मे जर करूं लागलों तर, पापाचा घडा भरला ह्मणजे, एकादे दिवशीं तरी ईश्वरी क्षोभ होउन, भलते एकादे लाहान मनुष्याचे हातून आपले पारिपत्य घडलें जाईल. ह्मणोन आपलें बरें व्हावें अशी इछा आहे तर, आपण लोकांचें बरें करीत असावें.

---

## गोष्ट—५५

### कुळंबी आणि शाहामृग

एके कुळंब्यानें शेत पेरिलें होतें, त्यास हंस व बगळे यांचा उपद्रव फार झाला, तेव्हां त्याणें शेतांत जाळें मांडून पुष्कळ हंस व बगळे धरिले, त्यांबरोबर एक शाहामृगही सहज आला होता तो फांसला गेला; तेव्हां तो शाहामृग कुळंब्याची प्रार्थना करून ह्मणतो, "दादारे, मला मारूं नको, पाहा मी हंस नव्हे, बगळाही नव्हे: दान शाहामृग

आहे

आहें; आह्मी स्वधर्मानें वागत असतों. आई बापां स ह्मातारपणीं आपले पाठीवर वाहून पोशितों; त्यास कुळंबी ह्मणतो, "रे तें सर्व खरें असेल, परंतु या वेळेस तूं मला पाईटांचे संगतींत आडकला आहेस, ह्मणोन तुलाही त्यांचे बरोबरीनें पारिपत्य केलें पाहिजे.

तात्पर्य

दुर्जनाचे संगतीनें सज्जन अप्रतिष्ठा पावतो, आणि ज्या संकटांत ते पडतात त्यांत तोही पडतो.

---

गोष्ट—५६

डुकरी आणि लांडगा

एक डुकरी नुकतीच व्याली होती, तिचीं तीं कोवळीं कोवळीं पिलीं पाहून एके लांडग्यास फार आशा लागली, किं यांतून एकादें तरी मला खा

यास

घास मिळतें तर बरें होतें.मग तो लांडगा बहुत दिवस लाग पाहात होता,परंतु संधी सांपडेना; तेव्हां,आपणावर डुकरीचा विश्वास जडावा ह्मणोन,तो तीजपाशीं येऊन गोड गोड गोष्टी करूं लागला;तीस ह्मणतो,"बाई,तुह्मी बरी आहांना?ह्या के ढिकाणीं बसून तुह्मी फार भागलों असाल ना हीं बरें?मज जोगतें कांहीं काम असेल तर सांगा, मनांत किमपि शंका धरूं नका.तुमच्या मनांत असेल की अंमळ बाहेर फिरून यावें,तर सुखें जाउन या;या तान्हे बाळांची कांहीं काळजी करूं नका,मी यांस जीवाचे जतनेनें सांभाळीन." डुकरीनें तें ऐकून घेउन उत्तर केलें,"लांडगे दादा, तुमची मी फार आभारी झाल्यें,तर तुह्मांस सांगावें माझें काम इतकेंच आहे कीं,कृपा करून एथून आतां निघोन जावें;आणि आपण जर मोठे भले असाल,तर पुनःआपलें तोंड मला दाखवूं नये."

तात्पर्य

तात्पर्य

केवळ परहितार्थ उद्योग करणारे असे या सृ ष्टीत विरळा आहेत; ह्मणोन, जो कोणही प्रार्थिल्या वांचून आपलें हित करण्याची आवड दाखवि तो, त्या विषयीं मनांत शंकावें. मग जो दुष्ट आहे, किंवा आपला शत्रू आहे, तो आपणाकडे येऊन आप्तपणा दाखवूं लागला असतां, फार सावधगि री ठेवावी, हें काय सांगायाचें आहे.?

गोष्ट—५७

धनगराचा पोर

एक धनगराचा पोर मेंढरें राखीत असतां, ए के दिवशीं "लांडगा आलारे लांडगा झाला" ह्मणो न विनोदानें वेळोवेळों ओरडत असे. तें ऐकून जवळचे शेतांतून कुळंबी धांवून येत, आणि पाहा त तों तेथें लांडगा नाहीं; असे दोन चार वेळ ते

ठकले

ठकले गेले, तेव्हां त्यांणीं निश्चय केला कीं, पोर लबाड आहे; याची हाक पुनः आपण मनास आणूं नये. मग कांहींका वेळानें लांडगा खराच आला, ते समयीं, घाबरून तो पोर हाका मारूं लागला; तेव्हां तीही लबाडीच, असें समजून कोणही धावून गेला नाहीं; मग त्यांचीं तीं मेंढरें लांडग्यानें सावकाश मारिलीं.

तात्पर्य

जो पुरुष लबाड असा एकवेळ प्रसिद्ध झाला, त्याचे बोलण्यावर मग लोक विश्वास ठेवीत नाहींत. तो खराही संकटांत आहे तरी, त्याची गोष्ट खोटी मानून त्यास साहित्य करीत नाहींत.



गोष्ट—५८

साप आणि माणूस

एक मुलगें कुरणांत खेळत होतें, तेथें त्यास साप चावला, त्याचें विष चढून तें अर्भक तत्काळ मरण

रंग पावलें;तें पाहून त्याचे बापास मोटा क्रोध चढला,आणि हातीं शस्त्र घेउन तो सापामागें लागला;त्याणें तो साप बिळांत जाई जाई तों, त्यावर एक घाय केला,त्याणें त्याची शेंपटी मात्र तुटली;तेव्हां युक्तिचे वाटेनें सापास लोभवून मारावें आणि सूड पुरता उगवावा,असें मनांत आणून,दुसरे दिवशीं मुलाचे बापानें दूध,साकर,आणि मध,अशीं बिळाचे तोंडीं आणून ठेविलीं आणि सापास हाक मारून ह्मणतो;“मित्रा,अरे मित्रा, बाहेर ये,जी गोष्ट झाली ती झाली,अतःपर तूं आपले मनांत तें काहीं आणूं नको?आतां तुह्मी आह्मी सख्य करूं.”तें ऐकून सापानें आंतूनच उत्तर केलें, “बाबा आतां सख्या विषयीं तूं फुकट श्रम करूं नको;कांकिं,जों पर्यंत तुला मेलेले मुलाची आठवण राहील,आणि मला तुटलेले शेंपटीची,तों पर्यंत,आपले उभयतांच्याही मनांत एकामेकांचें कल्याण वागणार नाहीं.”

तात्पर्य

तात्पर्य

ज्याणें दुसऱ्यास अपकार केला आहे तो आपले मनांत भीत असतो कीं, तो कधींतरी सूड उगवील; आणि ज्यास अपकार झाला आहे तोही त्या अपकारास कदापि विसरत नाहीं; ह्मणोन त्यां दोघांशी पुनः मैत्री होणें कठीण आहे. आतां, थोरांस हें उचीत आहे कीं, शत्रूसही क्षमा करावी; परंतु शत्रूशीं मैत्री करून त्याचा विश्वास करणें हें त्यांसही योग्य नव्हे.

गोष्ट—५९

रणशिंगकरी

एका रणसिंगकऱ्यास लढाईत शत्रूंनीं धरिलें, आणि त्याचा प्राण घेऊं लागले; तेसमयीं तो बहुत काकुळतीस आला, ह्मणाला कीं; "मला मारूं नका, मजकडे कांहीं अपराध नाहीं; माझे हातीं हातेर नाहीं,

हो,यावरून पहा कीं मी कोणास मारिलें नाहीं, आणि पुढेंही मारूं शकत नाहीं; एका रणशिंगा वांचून दुसरें कशास मी कधीही शिवलों नाहीं; असें असतां,दादानों भला कां उगीच मारितां?"तें ऐकून शत्रु उत्तर करितात,"अरे ह्मणोनच तुला आह्मी मारणार ; तूं स्वयें मारीत नाहींस खरा, परंतु तें तुझें द्वाड रणशींग फुंकून तूं लोकांचे अंतःकरणांत वैर पेटवितोस,जेणेंकरून रक्ताचे पूर वाहातात.

तात्पर्य

ज्याणें कधींही हातानें तरवार परजली नसेल;बंदुकीचा चाप ओढिला नसेल;किंवा आणखी ही कांहीं जीव घेणारें असें हातेर हातीं धरिलें नसेल,असा पुरुषही,दुसऱ्याचे प्राण घात करूं शकतो.ही कळ पेटविणारी लाहानशीच वस्तू,जीस जिभली असें ह्मणताहेत,हीस जें विष आहे तें विचारलेले बाणापेक्षांही मारक आहे.हीची धार तरवाराहूनही

रवाराहूनही

रवारीहूनही अधीक तिखट आहे. हिचें सामर्थ्य काय सांगावें! हिचे नुसते हालण्यानेंच, लोकांचे प्राण जातात. मोठे मोठे राज्यांची उलटापालट होत्ये. आणि लोकांमध्यें परस्परांशी वैरें पडतात, अशींकीं एकामेकाचा प्राण घेतल्या वांचून त्यांचा शेवट होउंच नये. ह्मणोन जीभ हालवून अनर्थ उत्पन्न करितो तो सामान्य पातकी नव्हे; त्यास पारिपत्यही तसेंच असावें.



## गोष्ट—६०

### ससा आणि कांसव

एके दिवशीं ससा गर्वानें कांसवास तुछकरून ह्मणाला, "रे मजपुढें निघोन जाणार असा आज कोण आहे?" कांसव त्यास बोलिला, "रे तुझ्यामनांत असें आहे तर, आपण पैज मारूं या; जर मी त्या डोंगराचे पायाशीं तुझ्यापुढें पोहोंचलों तर

रूपये

रुपये पांच हे मलाद्यावेस, नाहीतर मी तुलाद्यावे; या आपल्या पैजेस हा कोल्हा साक्ष." ससानें तें मान्य केलें, नंतर ते दोघे संगतीं निघाले; तेव्हां, ससा मुळींच जातीचा चपळ, त्यावर आणखी धांवला, ह्मणोन, कांसव फारच मागें पडला; तें पाहून ससानें मनांत विचार केलाकीं, "आपण आतां थकलों आहों, अमळ या जवळचे झाडींत नीज घ्यावी; कदाचित कांसव पुढें निघोन गेलाच, तर त्यास आटोपतां आपल्यास काय उशीर आहे;" असें ह्मणोन तो झाडींत निजायास गेला. मागून कांसव हळू हळू, विसांवा नघेतां, एक सारिखा चालत होता, तो पैजेच्या ठिकाणीं जाउन पोहचला; आससा आपले सामर्थ्यावर भरवंसा ठेवून निजला तो निजलाच राहिला.

तात्पर्य

चपळ आणि तीक्ष्ण बुद्धीचाही आहे, परंतु जो कामास झटत नाहीं, त्याचें तें काम सिद्धीस जात नाहीं;

नाहीं; आणि मंद बुद्धीचा आहे, परंतु जो झटून उद्योग करितो, त्याचें तें सिद्धीस जातें. बहुत करून बुद्धिवान् जे पुरुष, ते गर्विष्ट, आळशी, निश्चिंत असे असताहेत; ते कामांत श्रम घेत नाहींत; ह्मणतात कीं "आपणास काय अशक्य आहे? आपण जे व्हां मनावर घेऊं तेव्हां, चोहों दिवसांचें काम चोहों घटिकांत करूं" असे भरंवशावरच राहून व पांचीं वर्षे दवडितात; आणि त्यांचे हातून कांहींच घडत नाहीं. आणि जो मंदमति; तो आपण बुद्धिवान् नव्हे जाणून उद्योगास झटत असतो, तेणेंकरून जें काम तो हातीं घेतो, तें त्यास साध्य होतें.

---

## गोष्ट—६१

### वेषधारी लांडगा

एक लांडगा मेंढयाचें कातडें पांघरून त्यांचा कळपांत जाऊन शिरला, त्याणें, आपण मेंढा ह्मणू

वुन

वून, पुष्कळ मेंढे नाहींसे केले. एके दिवशीं तें में ढरें राखव्याचे लक्षांत आलें, त्याणे युक्तीनें त्या लांडग्याचे गळ्यास दोरी बांधून त्यास झाडा चे खांदीस टांगून फांशीं दिलें. तितक्यांत त्या वा टेनें दुसरे मेंढरेराखे जात होते, त्यांतून एका नें त्यास पुसिलें "अरे. तूं हें काय केलेंस?तुला थे उ तर लागलें नाहीं?" तें ऐकून त्याणें लांडग्याचे आंगावरचें कातडें काढून त्यांचा संशय फेडिला. मग त्यांणीं त्याचे करण्याची वानणी केली.

तात्पर्य

बाहेरले आचारावरून कोणाच्या स्वरूपाची प रीक्षा होत नाहीं. बाहेर भला दिसतो ह्मणोन, आं तही तसाच असेल असें मानिल्यास आपण ठक ले जाउं. यासाठीं, सूज्ञ आहेत ते, प्रथम, आंतला शोध करितात; मग, जो आंत बाहेर सारखा पा रखीस उतरला नाहीं तो, विश्वास घातकी, वेष धारी, ह्मणोन त्याचा फारच द्वेष करितात.

गोष्ट—६२

## लांडगे आणि मेंढे

एके काळीं लांडग्यांशीं आणि मेंढ्यांशीं फार दिवस लढाई चालिली होती; ते समयीं, कुतऱ्यांचे बळावर मेंढे लांडग्यांस हारी गेले नाहीं; शेवटीं, त्यांचें त्यांचें तहा विषयीं बोलणें होउन असें ठरलें कीं, परस्परांनी परस्परांस ओली द्यावा; लांडगे मेंढ्यांस ह्मणाले कीं, "आह्मी आमचीं पोरें तुमचे स्वाधीन करितों; आणि तुह्मी आपले कुत्रे आमचे स्वाधीन करा." तें मेंढ्यांनीं मान्यकरून तसें केलें. मग लांडग्यांचीं पोरें मेंढ्यांकडे येतांच, त्यांणीं आपले आयांकरितां एकच कुई केली; ती होतांच, लांडगे धांवून आले, आणि मेंढ्यांस ह्मणाले "दुष्टहो, तुह्मी आमच्या पोरांस मारून तह मोडिलात, तर आतां तुमची आमची लढाई," असें बोलून ते मेंढ्यांवर तुटून पडले; ते समयीं, कुत्रे अवळ नाहींत ह्मणोन ते सहज मारले गेले-

तात्पर्य

तात्पर्य

शत्रूशीं तह करितां फार सावधगिरी राखावी. ज्या वस्तू आपले भरवंशाच्या; ज्यांवाचून आपण निर्बळ; त्या वस्तू ओलीसाठीं शत्रूचे हातीं देऊं न येत: दिल्या असतां, मग त्यास भांडणांचीं निमित्तें काढायास अडचण पडत नाहीं.

---

गोष्ट—६३

दोघे वाटसरू

दोघे वाटसरू संगतीनें चालिले होते, त्यांतील एकास, वाटेंत पडलेली रुपयांची बटवी सांपडली. ती हातीं घेऊन तो दुसऱ्यास ह्मणतो, "रे, ही पाहा मला रुपयांची बटवी सांपडली." दुसरा त्यास उत्तर करितो, "रे, मला सांपडली असें कां ह्मणतोस, आपणांस सांपडली असें ह्मण: आपण उभयतां सोबती, यासाठीं, लाभ किंवा हाणी,

जी

जी होईल ती दोघांची." तें ऐकून बटवीवाला ह्मणतो, "होय तर, मला सांपडलेले वस्तूचा भाग मी तुला कां देईन?" दुसरा ह्मणाला, "बरें तर, नको देऊं." मग ते दोघे कांहींसे पुढें गेले, इत क्यांत बटवीचा धणी शोध लावून सरकारचे शि पाई घेउन त्यांचे पाठीवर गांठीत आला; त्यांस पाहून बटवीवाला सोबत्यास ह्मणतो, "गड्या, आप ण गोष्ट वाईट केली." त्यास सोबती उत्तर करितो, "आतां, आपण गोष्ट वाईट केली असें कां ह्मणतोस? मी वाईट गोष्ट केली असें ह्मण; जर तूं मला तुझे सुखाचा वांटा देतास, तर मीही तुझ्या दुःखाचा विभागी होतों."

## तात्पर्य

जो पुरुष इच्छित असेल, की आपले संकट सम यीं दुसऱ्यानें आपणास उपयोगी पडावें, त्या णें मित्र करून ठेवावे. ते मित्र जोडायाची रीत

अशी

अशी आहे, की मुळी, आपण त्यांस उपयोगी पडावें; त्यांशीं मन मोकळें ठेवावें; कृपणता करूं नये; असें झालें तरच ते आपले संकटकाळीं उपयोगी पडतील.

---

गोष्ट—६४

## विहिरींत पडलेला कोल्हा

एके दिवशीं एक कोल्हा, विहिरीवर पाणी पियावयास गेला होता तो आंत पडला; इतक्यामध्यें, तेथें एक लांडगा आला, त्यास त्याणें विनविलें, "दादा, मी बुडतों आहें, मला काढ-एकादा दोर, अथवा दुसरी काहीं तशी वस्त आणून आंत टाकूनदे, जेणें करून मी वरता येईन." ती कोल्ह्याची दशा पाहून लांडग्यास दया आली, आणि तो त्यास ह्मणतो, "रे बापुड्या, मी तुजकरितां फार श्रमी आहें, तुजवरतीं देव असा कसा रे न

री

री कोपला? हाय हाय! गोष्ट मोठी वाईट झाली."
त्यास कोल्हा उत्तर करितो, "अरे बोलतोस तसें तुझ्या अंतःकरणीं जर यत्न आहे, तर आतां मज करितां उगाच श्रमी होत उभा राहूं नको; मला बाहेर काढायाचा उद्योग लवकर कर-अरे, जो गटंगळ्या खातो आहे आणि काहींका पळांनी बुडून मरणार, त्याची दुसऱ्यास नुसती दया आली, ती त्यास काय उपयोगाची?"

## तात्पर्य

नुसती करुणा येऊन काय उपयोग? जर तिजपासून काहिं तरि दुसऱ्याचे श्रमाचा परिहार होत नाहीं. जे दुसऱ्याचें दुःख पाहून उगेच कष्टी होऊं लागतात, ते दुःखिताचे मनांत दुःख दुणें मात्र करितात; तर जो आपले जड अवघड वेळेस कामास पडतो, हाय हाय करून उगाच कष्टी होत नाहीं, त्यासच आपलें दुःख खरें; तोच आप

ला खरा सखा, आणि हितकर्ता, ह्मणोन सम जावें.



गोष्ट—६५

ढीवर

कोणे एका ढीवराने नदीमध्यें एके कडेपासन दुसरे कडे पर्यंत जाळें पसरलें, आणि हातांत एक दांडुक घेउन पाण्यावर बडवुं लागला, कीं माशानी घाबरे होउन चोहों कडुन जाळ्यांत यावें. तेसमयीं त्या नदीतीरींच्या वस्तीकर एकजण तेथें होता, तो त्या ढीवराचा आचार पाहून त्यास विचारितो, "मित्रा, हें तूं काय करितोस? तूं आपले मनांत काय बरें समजला आहेस? तुं ह्या उपटी घालून घालून पाणी गढुळ करितोस, हें असें पाणी, आह्मी भरावें ना? आणि तुला कांहींच बोलूंनये? या तुझ्या उपद्रवांत आह्मी कसें रे राहावें? आं.? बोलत कांरे नाहींस?,, असा तो रागानें चडफड

न बोलतो आहे, त्यास ढीवर हळूच उत्तर करि तो, "रे, तुह्मी एथें कसें राहावें, या विचारा वांचून माझें काहीं खोळंबलें नाहीं; परंतु मी तुला खरेंच सांगतो, कीं हें असें केल्या वांचून माझानें राहावत नाहीं."

तात्पर्य

कितिएक पुरुष असे असताहेत, कीं त्यांपासून लोकांस पाहिजेतितका उपद्रव होऊ, त्याचा ते विचारच करीत नाहींत; लाहानसा एकादा त्यांचा स्वार्थ साधला ह्मणजे झालें. एक घर नागवायास सांपडावें ह्मणोन, सगळी आळीचीआळी पेटवितां चोर मागें पुढें पाहात नाहींत. कळ पेट विणारे आहेत ते, विचार करीत नाहींत, कीं या आपले लावालावीनें कितिकांच्या मैत्री तुटतील; कितिकां कुटुंबां मध्यें विरोध उत्पन्न होतील. राज कारस्थानी पुरुषां मध्यें कितिएक असे असताहेत कीं ज्याणी राज कारणांत घोघांवें

एक चित्त होऊं देऊंच नये; फुट पाडीत असावी; लढाया लागून रक्ताचे पूर वाहातील, तसें तसें क रीत असावें. सर्व राष्ट्राचें वाटोळें होउन आप ल्या हातीं सत्ता येत्ये असें जर आहे, तर तसें करायास ते अनमान करीत नाहींत. रांडावले बा यकांचीं आंसवें, पोरके मुलांची आरडा आरड, दुःखित लोकाची हाय हाय, हीं त्यां पुरुषांचे अं तःकरणास हालवीत नाहींत. ते या गोष्टींतील ढो वरासारिखे मनाचे घट्ट होउन आपलें काम क रीत असतात; आणि पुशिलें असतां ह्मणतात कीं "असें केल्यावांचून आमच्यानें राहावत नाहीं;" ह र हर! काय हो क्रूर कर्मे हीं; आणि कायहो ज्ञानें हीं! तर ज्याच्या हृदयांत नीतीचा लेश आहे, आ णि जो लोकांचे हित करीं, त्याणी असले अधर्मा च्या कर्मास शक्ती चालेपर्यंत हाणून पाडावें.

## गोष्ट—६६

### कांटेखाणाऱ्या उंटाची

कापणीच्या दिवसांमध्यें कोणी एक शेतकरी मा णसें घेउन शेताची कापणी करीत होता; त्यांकरि तां त्याचा उंट नाना प्रकारचीं अन्नें पाठीवर घे उन शेतावर चालिला होता, तो वाटेत एक बा भूळ पाहून तिचे कांटे खायास जुडला; त्यांचा स्वा द घेउन तो आपले मनांत ह्मणतो, "मी नेतों आहें असलीं अन्नें पाहून माणसें लाळ घोंटूत; परंतु या बाभळीचे कांटयांत जी रुची आहे ती मोठे श्रीमंती जेवणांत नाहीं."

### तात्पर्य

बरें वाईट, अथवा सुख दुःख, हीं अमकींच अ सें सांगतां येत नाहीं. ज्याणें जशीं मानिलीं तशीं तीं होताहेत. यासाठीं जो पुरुष इछितो की, आ पणास जें बरें वाटतें तें सर्वांस बरें वाटावें आणि आपण ज्यास वाईट ह्मटलें, त्यास सर्वांनीं वाईट ह्मणावें

ह्मणावें तो या गोष्टींतले उंटा सारिखा मूर्ख स मजावा.

गोष्ट—६७

सांबरी जी पाण्यांत पाहात होती

कोणी एक सांबरी नदीवर पाणी पीत होती; ती पाण्यांत प्रतिबिंबलेलें आपलें रूप पाहून फार स माधान पावली; मग पायांपासून मस्तक पर्यंत नि र निराळे आपल्ये अवयव न्याहाळून ह्मणत्ये, "आहाहा! हा माझे मस्तकावरील शिंगांचा सांग उ काय सुंदर आहे! किं ज्याणे माझें तोंड शोभि वंत केलें आहे! माझे विशाळ नेत्र कमळास लाज वितात! माझें आंग मऊ फुलासारिखें! असेच जर माझे हे पाय सुंदर असते, तर मी कोणास गणि त्ये ना; परंतु काय करूं? याणीं मला लाज आणि ली; हे बारीक ओंगळ दिसतात; त्यापेक्षां अग दींच नसते तरी बरें होतें." असी ती खंती क

रित्ये

रित्ये आहे, तंव, पाठीवर पारधी आले; त्यांची चाहुर समजतांच ती तेथुन पळाली; ती मागें ते हि लगट करित गेले; तेंव्हां ती त्यांच्या हातून लवकर निघून जावें ह्मणोन, आड वाटेनें जाऊं लागली तों झाडींत शिंगें गुंतून अडकून पडली; तें पाहून, पाठीवर ते होतेच त्याणी तीस धरिलें. ते समयीं, ती मनांत ह्मणत्ये, हे कटकटा! जे पाय मला वाईट वाटत होते त्याणी तर संकटांतून माझी निभावणी केली; परंतु ज्यां शिंगांचा मी गर्व वाहात होत्यें तींच मला बाधक झालीं!

## तात्पर्य

आपण सर्व अवयवांनी सुंदर नाहीं ह्मणोन स्त्रियांनी खेद करूं नये. खोडकर अवयव आहे तो असा समयीं, त्यांचे पातिव्रत्य रक्षणाविषयीं उपयोगी पडतो, तसा सुंदर अवयव पडत नाहीं. पातिव्रत्य हें स्त्रियांचा प्राण आहे, तें नसतां त्या प्रेतवत् जाणाव्या.

गोष्ट—६८

कोल्हा आणि कावळा

एक कावळा, मोठाएक मासाचा तुकडा तोंडांत धरून उडाला, तो एका उंचा झाडावर जाउन बसला; तें पाहून एक कोल्हा त्या झाडाखालीं गेला, आणि कपटानें कावळ्याचें सौंदर्य वर्णूं लागला; ह्मणतो, "रे पक्ष्या, मी तुला खरेंच सांगतों, की तुज सारिखा देखणा दुसरा पक्षी आपले पाहाण्यांत आज पर्यंत कधींही आला नाहीं; तुझी पिसें काय सुंदर! काय कोमळ! अहाहा! तुझ्या शरीराची कांती किति वानूं! तुझ्या अवयवांचे ठेवेकडेस तर पाहातच राहावें! तुला इतकें सर्व अनुकूळ आहे त्यापेक्षां, तुझा स्वरही चांगला असेल असें मलावाटतें; तो जर गोड असला, तर मग तुझी बरोबरी कोण करणार आहे?" कावळा, ती प्रशंसा ऐकोन आपण कोण हें विसरला; आणि आपले ठायीं काहीं नटून मुरडून विचार करितो की या

स आपले स्वरा विषयीं भ्रांत आहे ती तितकी फेडून टाकावा; असें मनांत आणून त्याणें गायनास आरंभ केला; तो करितांच, तोंडांत आमिषाचा तुकडा होता तो खालीं पडला, तो घेउन कोल्हा त्याच्या वेडेपणास हंसत मार्गस्थ झाला.

## तात्पर्य

प्रशंसेस भुलतो तो फसतोच, असें जाणूनही तीस भुलत नाहींत असे पुरुष विरळा. ज्यास प्रशंसा नीट करितां येत नाहीं, त्याची ती एकादे वेळेस फुकट जाइ; परंतु जर करणारा कुशळ आहे तर, तो मोठे सावध मनुष्याचेंही मन हरण करितोः तें असें किं, जे प्रशंसेच्या हातीं सांपडत नाहींत, त्यांचा तितकाच गुण, प्रशंसा करणारानें, घेतिला पुरे, ह्मणजे ते विरघळले. ह्मणोन हा प्रशंसा पाश चुकवायास, या वांचून दुसरा उपाय दिसत नाहीं, कीं आपले गुणांचा परीक्षक आपण व्हावें; दुसऱ्याचे ह्मटल्यावर अगदिं जाउं नयेः ज

र आपण आपली परीक्षा नीट केली, तर आप ली योग्यता दुसऱ्यानें काय सांगायाची आहे? अ हो, प्राणि मात्रास आपणावर प्रीति इतकी अस त्ये, कीं आपणाहून दुसऱ्यास थोर ह्मणावें हें को णही इछित नाहीं; तसेंच, एकाची योग्यता दुसऱ्या स वास्तविकपणें समजत नाहीं; यासाठीं जो प्रशं सा करितो, त्याचे पोटीं काहींतरी स्वार्थ आहे असें समजावें.

---

## गोष्ट—६९

## दोन कुतऱ्या

एक कुतरी वियाला झाली, तिणें दुसरे कुतरी ची प्रार्थना केली कीं, "बाई, एक महीना पर्यंत तुमचें घर मला राहायास द्या. माझा बाळंतपणा झाला ह्मणजे मी तुमचें तुमचे स्वाधीन करीन." दुसरीनें बरें ह्मणून, लागलेंच घर रिकामें करून तिचे स्वाधीन केलें. पुढें एक महिना झाल्या नंत र घरधणीन वियाल्या कुतरीस भेटायास ह्मणो न

न गेली आणि मर्यादेनें ह्मणत्ये, "बाई,तुह्मी हातों पायीं उतरलींत पाहून मला फार समाधान झालें; आतां मला वाटतें की तुह्मांस पिल्यां सहवर्तमान घराबाहेर हिंडतां पाहावें," तिचा आशय सम जून बाळंत कुतरी तीस ह्मणत्ये, " खरेंच बाई, मलाही भीड वाटत्ये;मी तुमची जागा फारदिव स अडविली आहे,यामुळें तुमची आबळ होत असेल; परंतु काय करूं, माझीं पिलीं लाहान, अ शक्त,अद्यापि माझ्या मागें फिराया जोगतीं झालीं नाहींत; तर कृपा करून आणिखी मला पंधरा दिवस द्याल तर, मी तुमची बहुत उपकारी हो ईन."घरकरीण फार भिडस्त होती,तिणें तिला दु सरे ही पंधरा दिवस दिले; तेहि निघोन गेले त थापि घर रिकामें झालें नाहीं पाहून, ती विश्या ले कुत्रीस ह्मणत्ये, " अगे तूं अद्यापि घरांतून नि घत नाहींस,तर तुझ्या मनांत मी तुला बळात्कारा नें बाहेर काढावें असें आहे काय?मला तर आतां माझी जागा पाहिजे."तें ऐकून पियाली कुत्री तीस

ह्मणत्ये, "काय, तूं मला बळात्कारानें बाहेर काढणार? तर आत्तां काढ पाहूं कशी काढत्येस ती; मी तुला निक्षुण सांगत्यें कीं तूं मला बळात्कारानें काढीस पर्यंत हें घर तुझ्या हातीं येणार नाहीं."

## तात्पर्य

ज्याच्या हातीं ससा तो पारधी; तसी ज्याच्या स्वाधीन वस्तु तो तीचा धणी. यासाठीं एकादि आपल्ये जिवाळ्याची वस्तु आहे ती दुसऱ्याच्या हातीं गेली असतां, पुनः परत येईल असा दृढ भरंवसा झाल्यावांचून, हातची दवडूं नये. जे पुरुष शाहाणे, उदार आहेत, तें दुसऱ्यास देवबेल तें समयीं अगदींच देतात; परंतु जें पत्तीचें कुळ नव्हे अथवा लबाडी करील, असी ज्यावर शंका उत्पन्न होत्ये, असल्यास उसनें ह्मणोन देणें हा वेडेपणा होय.

गोष्ट—७०

## कोल्हा आणि शाहामृग

एके दिवशी कोल्ह्यानें शाहामृगास आपले घ रीं जेवायास बोलाविलें, आणि त्याची थट्टा करा वी ह्मणोन एके सुंदर ताटांत खीर घालून त्या पुढें मांडिली, मग दोहों कडोन दोघे जण खाऊं लागले; तेव्हां शाहामृगाची चोंच लांब, तींतून खी र घेतां यावी ह्मणोन त्याणें नाना प्रकार केले, परंतु येईना, तितक्यांत, कोल्हा ती वेंचवून ताट चाटूं लागला. शाहामृग आपले मनांत ओशाळा होउन ससाव उपायी घरी गेला.तें सल मनांत ध रून, काहीं दिवस लोटल्यावर त्या शाहामृगानें कोल्ह्यास मेजवानी केली, आणि एका सरयींत आंबरस भरून त्या पुढें ठेविला; त्या भांड्या चें पोट मोठें, गळा लांब आणि बारीक होता, त्यांत कोल्ह्याचें तोंड शिरकेना; ते समयीं, शाहा मृगानें आंत मान घालून कसें खावें तें त्यास दा खविलें

खविलें. सारांश, शाहामृग यथास्थित धाला. तो आंबरस खात असतां जेव्हां जेव्हां मान बाहेर काढी, तेव्हां जे भांडयावर थेंब पडत, ते चाटू न कोल्ह्यानें वेळ मारून नेली; परंतु मनांत फार खट्टू झाला; मग आपले घरी जाते समयीं तो शाहामृगास ह्मणतो, "गड्या, तूं जें केलेंस तें यथायोग्य केलेंस, मी तुला केलें, तसें तू मला केलेंस, यांत मला वाईट वाटायास प्रयोजन नाहीं."

तात्पर्य

दुसऱ्याची थट्टा करून समाधान पावणें हें भल्या मनुष्याचें काम नव्हे; जो असें करितो त्याची मग दुसऱ्यानें उलटून थट्टा केली असतां त्याणें चिडूं नये. आपला खोटा रुपया आपणास परत केला असतां पदरी घ्यावा, जसें कोल्ह्यानें केलें; तें नकरून दुसऱ्यानें आपली अमर्यादा केली ह्मणजे मात्र आपण त्यास दोष ठेवितों; परंतु आपणास वाईट वाटलें असेंच त्यास वाईट वाटलें असेल, याचा विचार करीत नाहीं.

गोष्ट—७१

## गरुडपक्षीण आणि कोल्ही

एक गरुड पक्षीण आपले पिल्यांसाठीं कांहीं भक्ष शोधीत होती, तिणें एका कोल्हीचें बाळक उघडयावर पडलेलें पाहिलें; त्यास गवींत धरून उडत्ये आहे इतक्यांत, कोल्ही जवळच होती ती धांवत आली, आणि मोटे करुणा स्वरानें, डोळ्यांत आंसवें आणून ती तिची काकळूत करित्ये आहे "पक्षीण बाई, मज दीनावर दया करा; माझें एकुलतें एक लाडकें बाळक नेउन मला उघडी करूं नका; हें माझें बाळ मला दिल्यानें तुह्मी मला बाळाची भीक घातलीशी होईल." गरुड पक्षीण निर्दय, तिणें मनांत आणिलें, कीं आपला घरकों डा उंचा झाडावर आहे, तेथें ही कोल्ही आपणास काय उपद्रव करूं शकणार आहे. मग तिणें तीच्या प्रार्थनेस कान न देतां तें बाळक आपले पिल्लांपाशीं नेउन ठेविलें, ते समयीं कोल्ही रा

गानें

गानें वेडी झाली, आणि सूड कसा उगवावा ह्मणो न इकडे तिकडे पाहात्ये आहे तंव, तें दिवशीं ज वळच्या खलाटींत गांवकरी यांणीं गांव देवतेकारि तां होम केला होता, त्याची आग तिचे दृष्टीस प डली; तेथून ती एक विस्तवाचें कोलीत घेउन, ग रुड पक्षिणीचा घरकोंटा ज्या झाडावर होता तथें आली, आणि आशींपाशींहून काटक्या मेळवून आणून तिणें त्या झाडास आग लावण्याचा प्रयो ग आरंभिला. तें पाहून गरुड पक्षीण भयभीत झा ली, किं आतां पिल्यांसुद्धां आपली राख होत्ये. म ग ती उलटी कोल्हीची प्रार्थना करूं लागली, आ णि ह्मणत्ये "बाई, कृपाकरून आतां वैर पुरे कर, मी चुकल्यें.„ असें बोलून तिणें कोल्हाचें बाळ ती स जीवंत परत केलें.

तात्पर्य

द्रव्यानें किंवा अधिकारानें आपण बळिष्ठ आहों या भरंवशावर कोणाचाही घात करूं नये. आपण

मोठे

मोटे आश्रयास आहों, आणि ज्याचा घात करितों तो केवळ दुर्बळ आहे, ह्मणोन आपणास उपद्रव करूं पोहोंचणार नाहीं, असें सर्वथा मनांत आणूं नये. तो कितीहि लाहान मनुष्य असला, तथापि कोण त्या वेळेस, कोणते जागीं, कोण त्या युक्तीनें, वैर उगवील, हें कळणार नाहीं. एकवेळ वैर पडलें ह्मणजे शांत होणें कठिण. मोठा प्रबळहि राजा आहे, त्यास मारेकरी मारूं शकतो. जो वैर साधावें ह्मणोन आपले जीवावर उदार झाला, तो सहस्त्र युक्तीनें आपल्या वैऱ्याचा नाश करील. भलती एकादी ह्मातारी राजाच्या घरास आग लावूं शकेल. भलता एकादा दोन दुर्बळ मनुष्य, महाबळवानाच्या मुलाचा तरी प्राण घेऊं शकेल. यासाठीं हृदय कठिण करून जे लोकांस पीडा करितात, त्यांणीं दूरवर दृष्टि द्यावी.

गोष्ट—७२

## रानडुकर आणि गाढव

एका गाढवाचा पोराची आणि रान डुकराची अरण्यांत अवचीत गांठ पडली, तेसमयीं ते गाढव थट्टेनें त्यास ह्मणतें, "नमस्कार हो भाउ नमस्कार." ती सलगी पाहून डुकरास आश्चर्य वाटलें, आणि क्रोधाच्या आवेशानें त्याच्या मनांत आलें, कि आत्तां याचीं आंतडीं बाहेर काढावीं; इतक्यांत त्यास विवेक झाला, आणि तो गाढवास ह्मणतो, "रे हलके प्राण्या तूं आपले मार्गानें जा, मी गाढवाच्या रक्तानें आपली दाढ विटाळीत नाहीं; नाहींतर तुझा जीव घ्यावयास मला एक क्षणही न कोहोता.

तात्पर्य

मूर्ख आहेत ते आपणास शाहाणे समजून थोरांशी थट्टा करायास जातात, तर, त्यांपासून ते आपला जीव घेउन परत आले ह्मणजे त्यांणी

मोठा

मोठी केली ह्मणोन समजावें. मूर्खानें मूर्खांशी ला गावें, चाकरानें चाकराशीं, आणि हलक्यानें हल क्याशीं; हें जाणून राग न आणितां थोर आहेत ते लाहान मनुष्याचे एकदोन अपराध सहन क रितात; ह्मणोन लाहान मनुष्यांनीं निसुग होउन बारंवार त्यांशीं तसा प्रसंग घालायास लागूं नये.



## गोष्ट—७३

## दोहों बायकांचा दादला

एका पुरुषास दोघी बायका होत्या. पहिली, त्या चे बरोबरीचे वयाची, रूपानें साधारणच होती; आणि दुसरी, तरुण सोळा वर्षांची, अत्यंत सुंदर होती; तिचे सौंदर्यावर आणि गुणावर दादला फार संतुष्ट होता; परंतु ती पंनासी जवळ आले ला ह्मणोन त्याच्या भोगानें ती तशी सुखी नव्हती. त्याचे केंस कांहीं काळे व कांहीं पांढरे झाले हो

ते, ते त्याचे ह्मातारपणास सांगत, तें तीस फार वाईट वाटून ती ते विंचरायास बसे, तेव्हां त्यास नकळत हळूच युक्तीनें नित्य त्यांतील कांहीं पांढरे केंस उपटून काढी. तिला असें वाटे किं, जांतून कितिएक गोष्टी कशाही असोत, परंतु बाहेरून आपले नवऱ्याचे ह्मातारपणाच्या खुणा लोकांस जितक्या न दिसतील तितकें बरें. जी वडील होती तीस असें वाटे किं, हे पांढरे केंस माझ्या नवऱ्याचे वडीलपणास भूषण आहेत; ह्मणोन जेंव्हां जेव्हां तिची विंचरायाची पाळी येई, तेव्हां ती त्यांतील कांहीं काळे केंस उपटून काढी. या प्रमाणें उद्योग चालून साहा महिने माहां झाले तों, त्या बापुडे दादल्याच्या डोईवर एकही केंस उरला नाहीं.

तात्पर्य

ज्यास सारासार विचार समजत नाहीं त्याच्या कृपेपासूनही तोटा होतो. ज्या स्त्रिया आपले दाद

त्याचें

त्याचें हित इच्छित असतील, आणि ज्यांचें त्याच्या कपेकडे लक्ष असेल, त्याणीं भलतीहि गोष्ट करणें तीं त्याचे विचारावांचून करूं नये. कोणतीहि गोष्ट स्त्रियेस बरी वाटली, तथापि तीच तिणें दादल्यास समजावून केली असतां त्यांत उभयतांचें बहुत हित होईल, आणि तो स्त्रियांचा धर्महो होय.

---

गोष्ट—७४

बेडूक आणि दोघे बैल

दोघे बैल एके तळ्याच्या वरले कडेस झुंजत होते, ते तळ्यांतील एका बेडुकानें पाहिलें, आणि तो दुसऱ्या बेडकास ह्मणतो "रे पाहा पाहा, त-समोर काय होत आहे तें; हाय हाय, आतां आपली गत कशी होईल" दुसरा ह्मणतो, "रे तूं इतका कां त्याला भ्याला आहेस? त्यांचे भांडणाशी आणि आपणाशी संबंध काय? त्यांची जात वेगळी, रीत वेगळी, भक्ष वेगळा; ते आलास उपद्रव

करावयासाठी

करायासाठीं भांडत नाहींत; तर, एकानें दुसऱ्यास पिटून लावावें, आणि आपण कळपाचा स्वामी व्हावें, ह्मणोन भांडताहेत; असें असतां आपण आपलेठायीं मूर्खासारिखें उगीच भ्यावें हें चांगलें नव्हे" त्यास पहिला ह्मणतो "रे तें खरें, परंतु आतां असें होईल कि, त्या दोघांतून एक हारेल, तो पळून या तळ्यावर येईल, तेव्हां आपल्ये भेंडकोलून किति एक त्याचे पायांखालीं तुडविले जातील, तर यावरून तूं पाहा बरें, कि त्यांच्या भांडणाशीं आणि आपणाशीं किति जवळ संबंध आहे तो."

### तात्पर्य

थोर थोरांच्या भांडणांत जवळचीं दीनें सहज मारलीं जातात; मग जे थोरांचा पक्ष धरून पुढें निघतात त्यांचा नाश होतो हें काय सांगायाचें? ज्यांत सर्वांचें कल्याण होत आहे, असले एकादे गोष्टीत, मोटया बरोबर, लाहानानीं लागावें; परंतु केवळ लोकांच्या कल्याणार्थ उद्योग करणारे अ

से मोठे विरळा असताहेत. जे बऊतांच्या बऱ्याचें निमित्त करून भांडण उचलतात, त्यांचें लक्ष फार करून स्वार्थ साधनावर असतें; ते लोकां करितां भांडत नाहींत; तर, आपले हातीं राजसत्ता यावी, आपण राजभोग भोगावे, आपले आज्ञे खालीं सर्वांनीं राहावें, ह्मणोन भांडत असतात; मग ते अधिकारावर स्थिर झाले ह्मणजे प्रथम प्रजा पीडनास आरंभ करितात; यास्तव असेजे भांडणारे त्यांपासून शाहाण्यानीं दूर असावें सामर्थ्य चालल्यास दोन्ही भांडतेपक्षांस समयीं हाणून पाडावें, आणि लोकांची पीडा निवारणकरावी.

---

## गोष्ट ७५.

### गोठ्यांतील सांबर

कोणी एकसांबर पारध्याच्या कुतऱ्यानीं झाडींतून ऊसकून दिलें, तें पळत पळत एके खेड्यांतील

गुरांच्या

गुरांच्या गोठ्यांत शिरून पेंढ्याच्या गंजींत दडून रा हिलं; तें पाहून तेथील एकबैल त्यास ह्मणतो, रे, त्वां एथें येऊन काय योजिलें आहे? मला अ सें वाटतें कीं ज्यास भिऊन तूं निकलें आहेस तें मरण तुला एथें रोकडें प्राप्त होईल. सांबर त्या स ह्मणतें, मित्रहो, अर तुह्मी सर्व कृपा करून उ गेराहाल तर माझा निभाव होईल; सवड सा धून मी एथून लवकरच जाईन. मग तें सांबर सां ज होई पर्यंत तेथें होतें. संध्याकाळ होतांच, प्रथम कडब्याच्या जुड्या घेऊन गुराख्या गोठ्यांत आला, त्याच्या दृष्टीस तें पडलें नाहीं: त्यानंतर वाड्यावरील कारभारी आला, त्याणेंही त्यास पा हिलें नाहीं: तेसमयीं सांबराचे ठायीं हर्ष माई ना, तें बैलांस ह्मणूं लागलें, गडेहो, तुह्मी धन्य आ हां; आज मी वांचलों तो तुमच्या धर्मानें; तुह्मा सारिखे परोपकारी कोठेंही नसतील. तें ऐकून त्यांतील एक बैल त्यास ह्मणतो, रे, त्वां एथून बरेपणीं निभावून आपले ठिकाणीं जावें, हें आ

मच्या

मध्या मनापासून आहे, तर ईश्वर करू आणि या वाड्याचा धणी एथें नयेऊ; तो आला असतां, त्या स प्रंभर डोळे आहेत; त्याच्या दृष्टी पुढें तूं या पें ढ्यांत लपलें जाणार नाहींस. असें बोलताहेत तंव वाड्याचा धणी बाहेर गेला होता तो घरीं आला, येतांच प्रथम गोठ्यांत गेला, आणि चाक रांवर चडफडून ह्मणतो, रे राम्या, याबैला पुढें स डबा कांरे नाहीं? रे मी नित्य हाका मारितों तरी तुह्मांस लाज कशी नाहीं? रे सोन्या, त्या बैला पुढें दुसऱ्या चार जुड्या आणून घाल; कायहो ल वंडीचीं हाड माणसें हीं! असा चडफडत तडफडत इकडून तिकडे फिरतो आहे, आणि सर्वत्र निरखून पाहातो आहे, तंव, पेंढ्यांतून सांबराचीं शिंगें त्याचे दृष्टीस पडलीं; तीं पाहातांच तो चाकरांस ह्म णतो, रे हें रे काय या पेंढ्यांत! रे सांबर, रे धां वा रे धांवा. तें ऐकतांच चाकर बडगे घेऊन धांवले त्याणीं तत्काळ त्या सांबराचा प्राण घे तला.

तात्पर्य

तात्पर्य

आपले घरचे कामाची काळजी आपण जितकी बाळगितों, तितकी चाकर बाळगीत नाहींत; होईल तसें होऊ, जाईल तसें जाऊ, असें ह्मणून ते निश्चिंत असताहेत. ज्याचें अन्न खावें त्याचें हित होईल तें करावें, हाजो सेवकांचा धर्म, तो त्यांचे स्मरणींही नसतो; त्यांचें चित्त सर्वकाळ आपले स्वार्थावर असतें; तो ज्यांत साधेल तें ते करीत असतात, त्यापुढें धण्याचें हित त्यांस दिसत नाहीं. पाहिलें असतां, आंगचे उधळेपणामुळें मोडले गेले असे श्रीमंत थोडकेच निघतील, परंतु चाकरांनीं नाडिल्यामुळें धुळीस मिळाले असे फार. यासाठीं धण्यानें आपल्ये कामास आपण स्वतां सावध असलें पाहिजे; केवळ चाकरांचे विश्वासावर राहूं नये.

गोष्ट ७६

## कुतरा आणि लांडगा

कोणी एक लांडगा बहुत दिवस उपास पडून रोडेला होता, तो भक्षा करितां फिरत असतां एके चांदिणे रात्रीस एके कुळंब्याचे वाड्या पाशीं आला; आंत शिरला तों तेथें त्याणें एक शोजलेला कुत्रा पाहिला; त्याचें त्याचें आगत स्वागत झाल्यावर लांडगा कुत्र्यास पुसतो रे, तूं फार चांगला दिसतोस; मी खरेंच सांगतों कीं, तुझ्या प्रमाणें पुष्ट, आणि देखणा आपण आजपर्यंत कोणीही पाहिला नाहीं; तर सांग बरें याचें कारण काय तें? रे, मी तुझ्या पेक्षां पंनास वांट्यांनीं अधिक उद्योग करीत असेन; इतकें करून ही मला पोटभर खायाला मिळत नाहीं. कुतरा ह्मणतो, रे, मी करितों तसें तूं करिशील तर, तूं ही मज सारिखा सुखी होशील; लांडगा पुसतो,

तूं

तूं काय करीत असतोस? कुतरा ह्मणतो दुसरें काहीं नाहीं, धन्याचे दारापुढें रात्रीची चवकी करून मी चोरांस येऊं देत नाहीं. लांडगा ह्मणाला, तें मी मनापासून करीन गड्या; अरे, जो मी रानांत भटकत फिरून हिंव पाऊस सोसतों, त्या मला घराचे छाये खालीं बसून पोटभर अन्न मिळाल्यास दुसरें काय पाहिजे? या प्रमाणें ते उभयतां गोष्टीकरीत होते इतक्यांत, कुतऱ्याच्या गव्यास दोरीचा किरकोचा पडला होता त्यावर लांडग्याची दृष्टी गेली, तेव्हां तो त्यास पुसतो, गड्या, हें तुझ्या गव्यास कायरे दिसतें? कुत्रा बोलला, अंः, तें काहिं नाहीं; लांडगा ह्मणाला, नाहीं पण मलातर कळों देशील कायतें? कुत्रा सांगतो, रे, मी अंमळ द्वाड आहें; लोकांस चावतों ह्मणोन, आणि मी दिवसास निजलों ह्मणजे रात्रीस चौकी चांगली करीन ह्मणोन, माझा धणी मला दिवसा दोरीनें बांधीत असतो; परंतु, इकडे दिवस मावळला रे मावळला, ह्मणजे त्याणें मला

सोडिलें

सोडिलें; मग मी राजा, व्हावें तिकडे फिरावें. माझे खाण्या पिण्या विषयीं तर, माझा धणी आपले हातीं मला उष्टीं चारितो, तशींच अवघीं घरचीं माणसेंही माझी माया करिता त, पाचावर भाकर तुकडा उरेल तो मजवां चून दुसरे कोणास टाकीत नाहींत; आतां पा हा बरें कीं, मजसारिखें करिशील तर तूं किति सुखी होशील? तें ऐकतांच लांडगा मागले पायीं पळत निघाला, त्यास कुत्रा हाक मारितो, रे थेरे थेरे, पळतोस कां तें सांग? लांडगा दूरून च उत्तर करितो, नकोरे बाबा मला तें सुख; तें तुझें तुला असयी असो, मजसंगतीं तर मो कळे पणाची गोष्ट असेल ती कर; तुझे सारिखें बाधून ठेवून मला कोणी राजा केल्यासही न को.

तात्पर्य.

मोकळेपणा असून गरीबीही चांगली, परंतु प रतंत्र पणा असून मोठी पदवी चांगली नव्हे. जो

पराधीन

पराधीन झाला त्याचा सुद्गपणा, थोरपणा, धैर्य, तसेच दुसरेहि थोर थोर सद्गुण, त्याचे उपयोगी नाहींत: त्यास धण्याच्या हूकानें वागणें प्राप्त आहे, आणि धणी सांगेल तें नीच कर्महो करणें आवश्यक आहे.



## गोष्ट ७७.

### मेंढरूं ज्यास बकरीनें पाळिलें होतें

एक मेंढराचें पोर एका बकरीनें पाळिलें होतें, तें एके दिवशीं, बकरी संगतीं असतां, त्यास, एक लांडगा वाटेनें जात होता तो ह्मणतो, मुला तूं चुकतोस, हो तुझी आई नव्हे, तुझी खरी आई ती—त्या समोरच्या काळपांत चरत आहे. मेंढरूं उत्तर करितें, बाबा, तूं ह्मणतोस तें खरें, परंतु जिणें मला किति एक महिने पर्यंत उपाय नाहीं ह्मणोन पोटांत वागविलें, आणि व्याली तेव्हां या पृथ्वीचे पाठीवर निराधार टा

कून

कून आपण निघून गेली, ती माझी आई असें तूं ह्मणशील तर ह्मण, मी तर या बकरीस माझी आई असें ह्मणतों, कीं जिणें मला दीन अनाथ जाणून माझा अंगीकार केला; पोटच्या लेंकरा प्रमाणें पोषिलें, आणि सर्व गोष्टीनीं माझा सांभाळ केला. लांडगा ह्मणतो, अरे, पण जिणें तुला जन्म दिलें ती तुला पूज्य असावी, आणि तुझी ममता तिजवर विशेष व्हावी. मेंढरूं उत्तर करितें; तिणें जन्म दिलें असें मी ह्मणणार नाहीं; जीस मी काळा किं गोरा होईन हें ठाऊक नव्हतें, तिणें मला जन्म दिलें ही गोष्ट जर खरी आहे, तर तिणें हाही मजवर मोठा उपकार केला, कीं मला पुरुषाचें जन्म दिलें, जेणें करून मी खाटिकाचे हातीं पडणार. तर याहा बरें जीचा कोणते ही प्रकारानें मजवर उपकार नाहीं असे आईस मी आई कशी ह्मणूं.

तात्पर्य

## तात्पर्य

जीं आपलें बरें करितात तीं आपलीं मायबा
पें, ज्याणीं नुसतें जन्म दिलें तीं नव्हत. आई
बाप आणि मुलें, यां उभयतांनींही एका मेकां
स उपयोगीं पडलें पाहिजे: मुलें अज्ञान आहेत
पर्यंत आई बापानीं त्यांचें पाळण पोषण करावें;
विद्याभ्यास करवावा; मनस्वी लाड न करून त्यां
स आपले आज्ञेंत ठेवावीं; मग पुढें तीं कर्तीं
झालीं ह्मणजे त्याणींही, आई बापांस कोणते गो
ष्टी विषयीं उणें पडूं देऊं नये. असे हे परस्प
रांचे धर्म आहेत. बहुत करून मुलें द्वाड नि
घतात हें खरें, कीं तीं आपले वयाचे भरांत आ
ई बापांचें ऐकत नाहींत; तशीं किति एक आ
ई बापें ही वाईट आढळतात; कीं तीं आपले
मुलांस लाहान पणीं शिकवाया विषयीं श्रम घे
त नाहींत; आपले सामर्थ्या प्रमाणें त्यांस खाया
ला खर्चायाला देत नाहींत; आपण वडील इत
क्या सत्तेनेंच त्यांस असें वाटत असतें कीं आ

पण

पण जें जें करूं तें तें मुलानीं निमुट पणें साह्य त असावें: मग मुलेंही तें पाहून मर्यादा सो डितात. ह्मणोन बाप लेंकानीं, सोयऱ्या सोयऱ्या नीं, अथवा दादले बायकानीं, एक मेकांचें बरें करीत असावें तरच प्रीत राहाते: ज्यांत प्रीत नाहीं तो सोयरे पणा नांव मात्र.



गोष्ट ७८.

मोर जो आपला स्वर वाईट ह्मणोन खेद करी

एके दिवशीं मोरास आपला शब्द कठोर ह्म णोन बहुत खेद झाला, त्याणें सरस्वतीची प्रार्थ ना केली, हे दीन दयाळे देवि, मी तुझें वाह न असतां मला स्वरा विषयीं कोकिळानें जिंका वें हें तुझ्या कीर्तीस वाईट आहे; पाहा बरें, को किळ बोलूं लागला ह्मणजे सर्व लोकांचे कान ति कडे लागतात, आणि मी तोंड उघडलें पुरे, ह्म णजे माझी थट्टा करितात. ती मोराची प्रार्थ

ना ऐकून देवी त्याचें समाधान करिते, बाबा, मधुर स्वरा विषयीं कोकिळ सुखी आहे असें तु ला वाटतें, तर देखणे पणानें आणि मोठे पणा नें तूंही सुखी आहेस. मोर ह्मणतो, देवी वा णी जर गोड नाहीं तर त्या नुसते देखणे पणास काय करावें. देवी बोलली, अरें ईश्वरानें एक एकास एक एक गुण दिला आहे: तुला सौंदर्य; गरुडास बळ; कोकिळास सुस्वर; पोपटास मनु ष्य वाचा; पारव्यास शांति; हे पक्षी जसे आप आपले गुणावर संतुष्ट आहेत, तसें त्वांही असा वें; नाहीं तर उगीच आशा वाढवून आपणास न सतें दुःख मात्र करून घेशील.

तात्पर्य

एकानें सर्व गुण संपन्न असावें अशी ईश्वराची इच्छानाहीं: या करितांज्यास अनेक गुणा विषयीं आसोशीआहे, त्याणें, ते प्राप्तहोत नाहींत ह्मणो न खिन्न होऊंन आपणांत आहेत त्यांगुणांचा अ नादर करूंनये; असे घेऊन त्यांचीच इच्छीकरावी.

सर्व

सर्व गुण संपादून फळ हेंचकिं, चित्तास समाधान व्हावें; तें समाधान, ईश्वरें आपणास जें अनुकूळ केलें आहे तितक्यांत करून घेतलें असतां, या मनुष्य लोकीं जें सुख तें त्या पुरुषास प्राप्त झालें.



गोष्ट ७५

मुंगी आणि माशी

एके दिवशीं मुंगी आणि माशी यांची, आपापले थोरपणा विषयीं मोठी कटकट झाली: माशी मुंगीस ह्मणाली, अगे, माझे थोरपणाची तर कोणास भ्रांतिच नाहीं: पाहा कीं यज्ञ यागादिक कर्मा मध्यें जे जे पदार्थ असतात, ते मुळीं मी चाखल्यें, नंतर देवांस प्राप्त होतात. देवळा मध्यें उंच ठिकाण तें माझें. मी देवळांत असल्यें इतकें कोणी

णी असत नाहीं. मला राजाचे सभेंत जायास अड
थळा नाहीं. मी राजाचे खांद्यावर बसल्यें. या प्रमा
णें, मला जें जें व्हावें तेंमी श्रम केल्या वांचून खाल्यें,
पित्यें, आणि भोगित्यें; अशी जी मी, त्या मशीं तूं र
क बरोबरी कशी बरें करिशील? मुंगीनें तें सर्व ऐकू
न घेऊन तिला उत्तर केलें असें, ऐकल्येस; थोर यो
रांचे घरीं जाऊन जेवणें, त्यांत प्रतिष्ठा आहे खरी,
पण बोलावणें असलें तर: तुला तर लोक हांकीत
असतात, तरी तूं निलाजरेपणीं पाना वरून उठत
नाहींस. तूं राजसभेंत जाण्याच्या, आणि राजा
चे खांद्यावर बसण्याच्या गोष्टी, मोठ्या बनावून
सांगितल्यास; परंतु मला पक्कें आठवतें किं, एके
दिवशीं मी दाणा घेऊन घराकडे जात असतां वा
टेवर, तुमच्यांतला एक गृहस्थ एके पदार्थावर
बसून शिटक्या मारीत होता, ज्या पदार्थाचें नांव
हीं तोडीं उच्चारायास कंटाळा येतो. आतां
तूं ह्मणयेस, कीं मी देवळांत फार वेळ असल्यें,
त्याचें कारण मी तुला सांगत्यें; तुला घर ना दा
र, ना कांहीं उद्योग, ह्मणोन तुझा वेळ जात ना

हीं;

हीं; त्यामुळें तूं देवळांत राहून वेळ घा लविल्येस. तूं आह्मासारिखा श्रम घेऊन दा ण्याचा संग्रह करीत नाहींस, ह्मणोनच तुला थंडीचे दिवशीं उपाशीं मरायाचें पडतें; आणि आह्मी उद्योग करितों ह्मणोन त्या दिवसां मध्यें खाऊन पिऊन उबाऱ्याचे घरांत सुखी अ सतों.

तात्पर्य

उद्योग हि नाना प्रकारचे आहेत. कितिएक असे आहेत कि ज्यांत कांहीं फळ नसतें; जे करू न खोटी बढाई मात्र मिरवावी, आणि दुसऱ्यास आपला कंटाळा आणावा. दुसरे कितिएक अ से असताहेत कि, ज्याचा करणारा, जेथें गेला ते थें सर्वांस आवडतो. उद्योग आहे ह्मणोन राज सभेस जातो असें नाहीं तर, काहीं उद्यो ग नाहीं ह्मणोन जो तेथें वेळ घालवाया करितां जातो, त्याणें राज सभेस जाण्याची प्रतिष्ठा सांगूं नये. दंभा साठीं जे देवतार्चन मांडितात, त्यांची ती

भक्ति काय कामाची? ज्यास आपले घरीं कोंड्या चीही भाकर मिळेना, त्यास थोरांच्या पंक्तीस मिष्टान्नें जेवायास मिळून थोरपणा काय? तर तो च मनुष्य थोर ह्मणावा, जो उद्योगी; जो आपण मिळविलेले संपत्तीचें सुख घेतो; ज्यास उद्योगी पुरुष आवडतात; ज्यास आळशांचा कंटाळा; असले पुरुषास थोरपदवी नसेना कां, तो सर्वमान्य होय.

---

गोष्ट ८०

## ह्मातारा कुत्रा

एके कुतर्यानें, पूर्वी, आपले ज्वानींत असतां पुष्कळ पारधी करून धन्याचा लोभ संपादन केला; ते समयीं धन्यानें त्याचे मुके घेत असावे; कुरवाळीत बसावें; त्यास चांगलें चांगलें खाणें द्यावें; मग वय झालें तेंव्हां त्या कुतर्याच्यानें तशी चाकरी होईनाशी झाली; असें असतां ही, एके दिवशीं तो

धन्या संगतीं पारधीस गेला होता; तेथें बरोबर त्या कुत्र्यां पुढें जाऊन त्याणें एका हरणाची नं गडी धरिली; परंतु त्याचे तोंडांतील किति एक दां त पडले होते, व राहिलेले हालत होते ह्मणोन त्याच्यानें ती चांगली धरवली नाहीं; आणी तें ह रण हिंसकाहिंसक करून सुटोन गेलें; तेंपाहून ध न्यास मोठा राग येऊन तो त्यास बडवायास नि घाला; त्यास कुत्रा ह्मणतो, रे रे रे, अधमा! क्ष णभर हात आटोप; मी तुझा जुना चाकर, याचा काहीं विचार कर! रे मी हरण धरायास मनांतू न कांहीं आळस केला नाहीं, परंतु माझा उ पाय नाहीं तेथें मी काय करूं! या ह्मातारप णीं मला तुझी चाकरी होत नाहीं ह्मणोन तुला जर क्रोध येतो, तर माझे मागले चाकरीकडे ह ष्टदे, आणि तो चालीव.

तात्पर्य

## तात्पर्य

बहुत करून धनी लोकांची कृतघ्नता अशीच आढळत्ये; जंव पर्यंत आपण त्यांचे उपयोगीं पडतों आहों, तंव पर्यंत ते आपले; आपला उपयोग नाहींसा झाला ह्मणजे मग, ते आपले नव्हत. असेंच, किती एक अधम पुरुष, ज्यां वर आपण उपकार केले आहेत, ते मागील न आठवितां, पुढें आपले पासून उपकार घडत नाहींत, अथवा थोडे घडतात ह्मणोन आपल्यास उलटा अपकार करूं पाहातात.



## गोष्ट ८९.

### दुखणाइत घार

एका घारीचा पुत्र फार दिवस दुखण्यांत पडून अगदीं अंतला, ते समयीं त्यास आपलीं पूर्व कर्में आठवून मोठें भय उत्पन्न झालें. तेव्हा तो मा

तेव ह्मणतो, आई, कांहीं तरि व्रतें, उपोषणें, हे धमर्क्षी करून, देवा पाशीं मला अरोग्य माग. आई त्यास उत्तर करित्ये, बाबा, देव तुला आरोग्य करील, याचा भरंवसा मला दिसत नाहीं: जो तूं जन्मवर हिंसाच करित आला आहेस, ज्या त्यां देवास अर्पण केलेलेही पदार्थ हरण करण्या विषयीं मागें पुढें पाहिलें नाहीं, आणि त्यांकर्मा चा तुला कधींही पश्चात्ताप झाला नाहीं, त्या तुझ्या आरोग्याविषयीं मीही देवाकडे कोणते तोंडानें प्रार्थना करूं?

तात्पर्य

मजपासून पुष्कळ दुष्कर्में घडलीं आहेत; आतां माझी गत काय होईल? अशा विचारांत पडोन मरत्ये वेळीं जे महा भय प्राप्त होणार, तें लक्षांत ठेवून आजच कां सावध होऊंनये? जो जर्जर झाला, आणि ज्यास पुढें पाप करायास शक्ति राहिली नाहीं ह्मणोन झाला जो पश्चात्ताप, तो त्या

चा खरा पश्चात्ताप नव्हे. खऱ्या पश्चात्तापा वांचून ईश्वर क्षमा करीत नाहीं; कां कि असले पातका ची क्षमा करून देवानें पापाची वृद्धि कशी करा वी? यासाठीं, जो आपला शेवट सुखानें व्हावा असें इच्छितो, त्याणें पूर्वींच सावध होऊन पापा पासून हात आटोपावा.



गोष्ट ८२

## सिंह आणि उंदीर

एक सिंह, उष्ण काळाचे दिवशीं अरण्या मधें एके आंब्याचे शीतळ छायेस सुखें निजला होता; तेथें त्यास उंदिरानीं फार उपद्रव मांडिला, तेणें करून तो जागा होऊन त्याणें पंजांत एक उंदीर धरिला, त्यास पिसडून टाकणार तों, त्याणें सिंहाची प्रार्थना केली, महाराज, आपण थोर, सर्व श्वा पदांचे राजे, मी आपले पुढें केवळ रंक, माझ्या

रक्तानें-आपले हात विटाळूं नयेत; मला जीव दान द्यावें हेंच स्वामीस उचित आहे. तें ऐकून सिंहास दया आली, आणि त्याणें त्यास सोडून दिलें. पुढें एके दिवशीं, तोच सिंह अरण्यांत फिरत असतां, त्याच आंब्या जवळ पारध्यानें जाळें मांडिलें होतें, त्यांत सांपडलागेला; ते समयीं त्याणें आपलें बळ होतें तितकें वेचलें, परंतु सुटका होईना; तेव्हां निराश होऊन मोठ्यानें आरोळी मारिली; ती ऐकतांच तो उंदीर त्या जवळ धांवून आला, आणि ह्मणतो, राजा, भिऊं नको, स्वस्थ ऐस. असें ह्मणून त्या उंदिरानें आपल्ये दांतांनीं जाळ्याच्या गांठी कुरतुडून सिंहास मोकळें केलें.

### तात्पर्य

मोठे आहेत त्यांचे ह्मिसमयीं लाहानाचे हातून महत्कार्य होतें; या साठीं, जे आपले सत्तेखालीं आहेत त्यांवर आवडीनें कृपाच करित असावी.

लाहानाचे

लाहानाचे हातूनहि उपकार होऊं शकतात, दै
व हें सर्वकाळ सारिखें चालत नाहीं, अशी गो
ष्ट आहे जर, तर मग आपण सर्व लोकांशीं ब
रेभावानें कां चालूं नये? आपले चालते काळां
त आपण जर लोकांवर उपकार करून ठेविले
तर, लोकहि आपले पडते काळांत उपयोगीं प
डतील; सर्व न पडले तर, त्यांतून कोणी एकादा त
री कृतज्ञ निघेलच; कीं ज्या एकाच्या साहित्यानें
आपलीं सर्व संकटें दूर होतील.



गोष्ट ८३

उंदिराचीं सिंहीचें लग्न

मागील कथेंत सांगीतला सिंह जाळ्यांतून मो
कळा झाल्यावर प्रसन्न होऊन त्या उंदिरास ह्म
णाला, रे, तुझा मी मोठा उपकारी झालों, आ
तां तुला व्हावें तें माग, मी देईन. तें ऐकू
न उंदीर फुगला, आणि आपली योग्यता काय?

सागावें

मागावें काय? न मागावें काय? याचा विचार न करितां, सिंहास विनंती करितो, महाराज, ज्या अर्थी आपण संतोषानें व्हावें तें माग ह्मणोन बोलतां, त्या अर्थी मीहि भीड न धरितां मागतों, किं मला आपली कन्या द्यावी. ते शब्द कानीं पडतांच सिंहास मोटें वाईट वाटलें, परंतु काय करील? वचनास गुंतला यास्तव, दिली, असें बोलून, त्याणें आपली लेंक उंदिराचे स्वाधीन करायास आणिली, ती तारुण्याचे धुंदीनें चालत असतां, तिचा पाय वर पडोन उंदीर तत्काळ मरण पावला.

### तात्पर्य

आपले ठायीं सारासार विचार नसला तर भलताच पदार्थ इछून आपण दुःखांत पडतों; सारासार विचार ज्यास नाहीं तो मोटा सार्वभौम राजाहि आहे, तथापि आपणास सुखी करूं शकत नाहीं; तो राजा असून रंकाचीं दुःखें भोगितो;

आणि

आणि रंक आहेत ते या सारासार विचाराच्या योगानें इंद्राचे संपत्तीचें सुख भोगितात. या सारासार विचाराचें लक्षण हेंच कि, मी कोण? माझी योग्यता काय? माझा निर्वाह कितक्यानें होतो? इत्यादिक पाहून जें पाऊल टाकणें.

---

## गोष्ट ८४

## ससे आणि बेडूक

एके समयीं प्रचंड वारा सुटोन संपूर्ण झाडें डोलूं लागलीं; भुईं वरील पातेरा उडों लागला; आणि धुळीनें दिशा धुंद झाल्या; तें पाहून एके कुपणांत ससे होते ते भयानें गलबलून पळाले, ते मोटे प्रयासानें कुपणाची वई उडोन बाहेर पडले, आणि जीव घेऊन धांवताहेत तों, पुढें एक नदी आडवी आली. ते समयीं ते कष्टी होऊन ह्मणतात, अहो, आतां शिमा झाली: जिकडे जावें तिकडे आपले मागें विपत्तीच लागतात; तर आ

तां

तां अशा संकटांत काळ जो काढावा, त्यापेक्षां नदींत पडोन जीव द्यावा हें बरें. असा सर्वांनीं निश्चय केला; आणि नदीचे कांठाशीं गेले, तों तेथें बेडूक बाहेर निघाले होते, त्याणी त्यांस पाहून पाण्यांत उड्या टाकिल्या, आणि तळीं जाऊन बसले; तें पाहून त्यांतील एक म्हातारा ससा, बेडुकांकडे हात दाखवून म्हणतो, रे हें पाहा! भय हें सर्वां मागें आहे; अशी गोष्ट असतां, आपण त्यास भिऊन जीव जो द्यावा, त्यापेक्षां धैर्य धरून, जें दुःख येईल तें साहोन संकटा समोर कां होऊं नये? तें ऐकून सर्वांनीं धीर केला, आणि तेथेंच उभे राहिले असतां कांहीं कां घटिकांनीं वादळ शांत होऊन ते स्वस्थ झाले.

## तात्पर्य

कितिएक लोक नाना प्रकारचीं भयें कल्पून, हाय हाय! कसें होईल? काय होईल? अशा चिंतेनें रात्र दिवस कंठित असतात. त्यांस असें वाटतें किं काय जीं दुःखें आहेत तीं सर्व आपल्या

च मार्गे आहेत; वरकड सर्व विश्व सुखी आहे. परंतु ते ज्यांस सुखी ह्मणून ह्मणतात; त्यांचीं दुःखें जर ते पाहों लागतील तर, त्यांस असें वाटेल कि, आपण आहों ते बरे आहों; ईश्वरानें आपले कडोन, सर्वांस सुख दुःखें सारिखीं वांटिलीं आहेत; तीं आपणास अधिक उणीं वाटतात, हा आपला वेडेपणा.

---

गोष्ट ८५

## बेडूक आणि कोल्हा

एक बऊभाप नांवाचा बेडूक होता, तो एके समयीं तळ्यांतून बाहेर निघोन एका उंचा जाग्यावर जाऊन बसला. तेथून मोठ्या स्वरानें सर्व सावजांस पाचारून ऐकवितो, अहो, ऐकतां, मी मोठा चांगला वैद्य आहें; कोणता कसाहि रोग असला तऱ्ही मला दूर करितां येतो; असें बोलून तो आपला जाणतेपणा दाखवाया करितां कां

हिं शास्त्रांतील वचनेंहि गुडबुडूं लागला. सावजां स त्यांचा अर्थ समजला नाहीं, परंतु वाटलें किं हा कोणी मोठा जाणता वैद्य आहे; मग तो जें जें बोलत गेला त्यास सर्व माना डोलवित गेले. तेथं कोल्हा होता, त्यास तें साहिलें नाहीं; त्याणें रागें भरून बेडुकास ह्मटलें, अरे मूर्खा, तुझा तोंडाचा जबडा चुंफलेला आहे, तुझें सर्वांग डागानें भरलेलें आहे, तुजवर कांहीं तेज दिसत नाहीं, तो तूं ह्मणतोस किं, मी दुसऱ्याचे रोग दूर करीन; याची तुला लाज कशी वाटत नाहीं.

## तात्पर्य

ज्यास आपले आंगचे दुर्गुण नीट करवत नाहींत, त्याणें दुसऱ्याचे ते नीट करण्याचे भरीस पडेंनये. जो दुसऱ्यास उपदेश करितो त्याचें आचरण तर असें असावें, किं त्या विषयीं लोकांस विकल्प येऊंच नये, तरच त्याचा उपदेश मान्य होईल. जो दोष दुसऱ्यानीं टाकावा ह्मणोन आपण चौघांत उ

पदेश करितों, त्याच दोषानें आपण लिप्त आहों तर तो मान्य कसा पडेल? आणि आपली थट्टा झाल्या वांचून कशी राहील?

---

गोष्ट ८६

डोम कावळा ज्याणे मोराचीं पिसें आंगास लाविलीं होतीं

कोणी एका डोम कावळ्यास असें वाटलें कि आपण थोर व्हावें, आपल्ये जातीचे लोक हलके, यांचा समागम करूं नये. असें मनांत आणूनत्याणें कांहीं मोराचीं पिसें गोळा केलीं, आणि तीं आपले पाखांत रोवून तो मोरांचे मंडळींत शिरला. मोरांनी त्यास पाहातांच ओळखून त्याचे भोंवतालें मिळाले, आणि प्रथम, चोंची मारुन मारून अर्धमेला केला; मग त्या पासून तीं खोटीं पिसें वूचाडून घेऊन त्यास आपले मंडळींतून हाकून दिलें. अशी अवस्था झाल्यावर तो खिन्न होऊन आ

पले जातींत शिरायास लागला, ते समयीं का वळ्यांस त्याचे पूर्व ढंग ठाउक होतेच, त्याणी त्यास जवळ उभें केलें नाहीं. आणि त्यांतून एका कावळ्याने त्यास छी थू करून ह्मटलें, रे मूर्खा, ईश्वरें तुला ज्या जातींत निर्माण केलें, ती तूं सोडिली नसतीस, तर आज तुला हा अपमान कां प्राप्त झाला असता?

## तात्पर्य

ईश्वरें आपणास ज्या स्थितींत निर्माण केलें आहे, ती वाईट मानून दुसऱ्याचा थोर पणा आपले ठायीं ओढून आणायास गेलों असतां, विपत्तींत पडतों; आणि आपले बरोबरी च्यांचे मनांत आपला कंटाळा आणितों. असा पुरुष असतो तो दोंही कडून फसतो: पर जातीचे आहेत ते त्याचा तिरस्कार करून उपहास करितात; आणि जातिद्वेषी ह्मणून स्वजातीचेहि अंगिकार करित नाहींत.

गोष्ट

गोष्ट ८७

## सिंह आणि पशु

एके समयीं सिंह आणि कितिएक पशु, याचां करार झाला किं, आपण एका मतें एका विचारानें घालावें; व जें मिळेल तें सारिखें वांटून घ्यावें. एके दिवशीं सिंह, कोल्हा, लांडगा, आणि तरस, यां चौघानीं मिळोन एक हरण मारिला; त्याचे कोल्ह्यानें चार वांटे केले. तेव्हां सिंह पुढें होऊन आणि त्यांतील एका विभागा कडे बोट करून त्यांस ह्मणतो, रे ऐकतां, हा भाग मी माझा कर ह्मणोन घेतों. हा दुसरा तर, मीच घ्यावा, कां किं, तुह्मी जो पराक्रम केला, तो सगळा माझे बळावर. मग तिसऱ्या भागाकडे पाहून तो डोकें हालवून ह्मणतो, हा भाग मी या साटीं घेणार किं, ज्या अर्थीं तुह्मी माझी प्रजा, आणि मी तुमचा राजा, त्या अर्थीं तुह्मी मला भक्तीनें यालच. आतां हा शेवटचा भाग; तुह्मी जाणतां; सांप्रत

आपला

आपला काळ अडचणीचा आहे; सेने करितां आपले जवळ भक्षायाची वरव पुष्कळ नाहीं; ह्मणोन मला हा जतन करून ठेवणें प्राप्त आहे. कां कि, पुढें अडचण पडेल तों तिची सोय आज करून ठेवावी अशी नीति आहे. कां? मी ह्मणतों हें तुमचे विचारास येतें ना? नाहीं ह्मणाल तर त्यांत माझें कांहीं जात नाहीं; तुमचाच नाश होईल, हें लक्षांत आणा.

तात्पर्य

दुर्बळ आणि बळवंत यांची एकी फार दिवस नीट वह्विाटत नाहीं. बळवंत आहेत ते मुळीं एक होतां वेळे, आण भाष करितात; परंतु संधि फावली असतां करार मोडायास त्यांस उशीर लागत नाहीं. ह्मणोन, त्यांशीं योग करणें हेंच प्रथम मूर्खत्व होय. एक वेळ त्यांचे कच्छपीं लागून फसल्यावर मग, आह्मास त्याणीं असें ठकवावें काय हो? ह्मणोन दुसऱ्या पाशीं विस्मय करणें, हें तर अत्यंत मूर्खत्व होय.

गोष्ट

गोष्ट ८८

लांडगा आणि बगळा

कोणी एका लांडग्यानें मेंढा मारून खाल्ला, त्याचें हाडूक गळ्यांत अडकलें, मग त्या वेदनेनें तो वेडा होऊन टाहो करीत रानांत फिरूं लागला. जो जो प्राणी भेटे त्याची तो प्रार्थना करी कीं, दादा, कृपा करून इतकें माझे गळ्यांतील हाडूक काढशील तर मी तुला चांगली देणगी देईन. तें ऐकून एक बगळा देणगीचे लोभानें पुढें झाला; आणि प्रथम लांडग्या जवळून आण भाष करवून, त्याणें त्याचे तोडांत आपली लांब मान घातली, आणि हाडूक बाहेर काढिलें. पुढें, देणगी मागूं लागला ते वेळीं, लांडगा डोळे वटारून त्यास ह्मणतो, रे, असा मूर्ख मी त्रिभुवनांत पाहिला नाहीं; अरे, तुझी मान माझे तोडांत होती ती न चावतां मी तुला जीवंत सोडिला, तरि आजून तूं संतुष्ट नाहींस?

तात्पर्य

कितिएक अधम असे आहेत कि, त्यांस साह्य झालें असतां दोन दोष घडतात: ज्यास साहित्य करायास योग्य नव्हे त्यास तें केलें, हा एक: आणि त्यांशीं संबंध करून आपणास संकटांत घातलें, हा दुसरा. कांकिं, उपकारास अपकार करणें हा दुष्टाचा जातिस्वभाव होय. अधमाचे हातून हाणी न होतां सुटलों ह्मणजे फार मिळविलें ह्मणोन समजावें.



गोष्ट ८९

दोघे ठक आणि भाजीविक्या

कोणी एका भाजी विक्याचे दुकानावर दोघे ठक गेले, त्यांतील एकानें त्याची दृष्टि चुकवून एक भोंपळ्याची फांक चोरून सोबत्या जवळ दिली, ती सोबत्यानें आपले झग्यांत लिकविली. भा

जीविक्या पाहूं लागला तों, भोंपळ्याची फांक ना हीं; तेव्हां तो त्यांस ह्मणतो, रे, तुह्मी माझ्या भों पळ्याचा तुकडा चोरिलात तो लवकर टाका, ना हीं तर तुमची शोभा राहाणार नाहीं. ते समयीं ज्याणें चोरी केली होती तो ह्मणतो, रे दादा, मी शपथ घेतों, कीं तुझ्या भोंपळ्याचा तुकडा मज पाशीं असेल तर माझें निसंतान होईल. ज्याणें लपविला होता तो ह्मणाला, रे बाबा, मी जर तु झा भोंपळ्याचा तुकडा चोरला असेल, तर सग ळे लोकांचे पाप माझे माथीं पडो. तें ऐकून भाजी विक्या त्यांस ह्मणतो, रे मी तुमच्या बोलण्याचा भाव समजलों. तर तुह्मां दोघांतून एकजण चो र आहे, आणि तुह्मी दोघेहि लुचे आहां, यां त मला कांहीं संशय नाहीं.

तात्पर्य

भल्याचें वचन शपथे सारिखें जसें, तसेंच लबा डाचें हि. कां किं जो लबाडी बोलोन ठकवाया स इछितो तो, शपथ घेण्या विषयीं मागे पुढें पा

हाणार

होणार नाहीं. ह्मणून, चोर, ठक, लबाड, हे सर्व एके माळेचे मणी, यांचे शपथेचा विश्वास करूं नये. किति एक लबाड असे असतात किं, ते लबाडी करूनहि आपणास लबाडांत मोजित नाहींत. ते, शपथ मोडण्यांत पातक आहे हे जाणोन, ती करणें तर अशी करितात किं, जींत दोन अर्थ, डावा, उजवा, जिकडे लावावा तिकडे लावितां येईल; ते पुरुष तर महा पातकी ह्मणावे; किं ज्याच्या इच्छामात्रेंकरून ब्रह्मांडें होतात जातात; जो मनांचा साक्षा; त्या ईश्वरा पुढें हि जे पर्याय सांगायास चुकत नाहींत.



गोष्ट ९०

माळी आणि कुत्रा

एका माळ्याचा कुत्रा मळ्यांतले विहिरीचे कांठीं वागडत होता, तो त्यांत पडला, आणि ओरडूं लागला. तें ऐकून माळी धांवत आला; त्याणें

त्यास

त्यास बाहेर काढाया साठीं विहिरींत हात घाल तांच, कुत्र्यानें त्याचे बोटास चावा घेतला. तेव्हां त्यास माळी रागें भरून बोलतो, रे दुष्टा, तुला वांचवायास जो हात आला! अरे, ज्या हातानें आज पर्यंत तुझें पाळण पोषण केलें, त्या माझे हा तासच त्वां उपद्रव केला! तर मर आतां, तुज सारिखा अपकारी प्राणी वांचायास योग्य नाहीं. असें ह्मणोन तो कुत्र्यास विहिरींत तसाच बुडत टाकून चालताझाला.

तात्पर्य

जो कृतघ्न आहे तो, केलेले उपकार व्यर्थ घा लवून उलटा आपणास अपकार करितो. या सा ठीं, जे परोपकारी पुरुष आहेत त्याणीं, उपकार करणें तो पात्र पाहून करावाः दुष्टावर केला असतां फुकट जाऊन आपली हाणी आणि जगा में हांसे मात्र होईल.

गोष्ट

गोष्ट ९१

## पंतोजी आणि मुलगा

कोणी एका शाळेंतला मुलगा, पारंग्याचीं वाहिलें कमरेस बांधून, नदींत पोंहायास शिकत असे. एके दिवशीं त्यास वाटलें किं, आपणास पोहोंतां आलें, आतां यां लांकडांचें काय प्रयोजन आहे? ह्मणून त्याणें तीं लांकडें कांठीं ठेवून, नदींत सराळी घेतली, तो ओघाच्या लोटानें ओंढे पाण्यांत गेला; आणि गचकव्या खाऊं लागला. दैव योगानें एक वृक्षाची डाहाळी नदींत झोकली होती, तेथें तो लोटत लोटत गेला; तेव्हां तीस गच्च धरून बुडतों रे बुडतों ह्मणून हाका मारितो आहे, अशे समयीं त्याचा पंतोजी, नदीचे कांठीं सहज गेला होता, त्याचे कानीं ते करुणा शब्द पडले; तो पुढें जाऊन पाहातो तों, मुलगा संकटांत दृष्टीस पडला. तेंव्हां तीं लांक

डें त्याणें गुला कडे उडविलीं; त्यांस धरून तो कांठीं आला. ते समयीं पंतोजीनें त्यास हा उ पदेश केला: अरे मुला, आजून पुढें तुला ही संसार महानदी तरून जायाची आहे; तूं स्वतं त्रपणें वागायास अद्यापि प्रौढ नाहींस; यासाठीं तुजहून वडील आहेत त्यांचीं वचनें नदींत त रायाचे लांकडां सारिखीं मानून, त्यांचा तूं अना दर करूं नको.

तात्पर्य

किति एक पुरुष असे अभिमानी असताहेत, किं ते सहस्र अडचणी सोसितील, परंतु दुसऱ्या ची बुद्धि घ्यावी असें त्यांस वाटणार नाहीं. या संसा र सागरा मध्यें राहाणें फार कठिण आहे; एथें असा कोणी पुरुष आढळत नाहीं किं, ज्यास दु सऱ्याचें साहित्य नको; त्या मध्येंहि, जे तरुण आ हेत; ज्यांस सृष्टीची रीत आजून पक्की समजली नाहीं; त्याणीं तर स्वबुद्धीनें चालूंच नये.

गोष्ट

## गोष्ट ६२

### कोंबडा आणि रत्न

एक तरुण कोंबडा, दोघी तिघी तरण्या कोंबड्या संगतीं घेऊन, उकिरडा उकरीत होता; त्यांत जो अपूर्व पदार्थ सांपडे, तो त्यांस देऊन तो रिझवीत असे. तेथें अवचित एक रत्न त्याचे दृष्टीस पडलें; त्याचे जोतीवरून हें रत्न आहे असें त्याणें जाणिलें; परंतु त्याचा उपयोग कसा करावा तें त्यास ठाऊक नाहीं. मग त्याणें आपला मूर्खपणा झांकाया करितां त्या रत्नाचा उपहास आरंभिला; तो पांख उघडून मान हालवून, तोंड वांकडें करून, त्यास ह्मणतो; रे, तूं चांगलें आहेस खरें; परंतु तुला काय करावें? माझे बुद्धीनें तर तुझीं सर्व सृष्टीतलीं रत्नें, एका जोंधळ्याचे दाण्याची बरोबरी करूं शकणार नाहीं.

## तात्पर्य

द्रव्यानें विद्या प्राप्त झाली; बरं वाईट, नीत अनीत, हें समजूं लागलें; परंतु ज्यास त्यांचा उपयोग करितां येत नाहीं, त्या पुरुषास तें काय होय? जसें कोंबड्यास रत्न. तर असे जे पढत मूर्ख आहेत ते, आपला मूर्खपणा झांकाया करितां, विद्यादिकांचा उपहास करून, आपल्यास द्रव्य तें स्थापूं लागतात: ह्मणतात किं, सध्या फळ देणाऱ्या गोष्टीस सोडून, विद्यादिक गुणांस काय करावें? असें ह्मणोन ते विद्वान असोनही, हलकीं कामें अंगीकारितात.



## गोष्ट ६३

## लांडगा आणि करडूं

कोणे एके समयीं उन्हाच्या तापानें एके करडुवास फार तहान लागली; तें एके ओढ्यावर पाणी पिण्यास गेलें; तेथें वरले कडेस लांडगा पा

णी

णी पीत होता, त्यास पाहून तें खालचे कडेस पि
ऊं लागलें. तें लांडग्याच्या दृष्टीस पडतांच, त्याचें
मनांत आलें कीं, कांही निमित्तानें कळ काढून
आपण यास मारून खावें. मग तो त्या करडुवास
ह्मणतो, रे, तूं हें पाणी गढूळ केलेंस, आतांमीं
आपली तहान कशीरे भागवूं? तर असें कराया
स तुला काय कारण, तें लवकर सांग? नाहींत
र प्राणास मुकला जाशील. करडुं विचारें घा
बरलें, आणि नमून बोलूं लागलें; लांडगे दादा,
तूं ह्मणतोसहें होईल तरि कसें? तुझे कडून वा
हात येतें तें पाणी मी पितों; असें असतां माझें
गढूळ केलेलें पाणी तुझ्याकडे उलटें कसें चढलें?
लांडगा ह्मणाला, तें असो, परंतु तूं लुच्चा आहे
स; तूं आज साहा महिन्यावर, माझे मागें, मला
शिव्या देत होतास, असें माझे कानीं आलें. करडुं
ह्मणालें, हर हर. अशी गोष्ट कशी होईल? रे म
ला जन्मून नुकते तीन महिने झाले नाहींत, तो
मी साहा महिन्यावर तुला शिव्या कशा देईन?
लांडगा तेथेंहि कुंठित झाला. मग मोठा क्रोधाचा

आवेश

आवेश आणून, डोळे वटारून, हात पाय आपटि त करडवा जवळ आला, आणि दांत खाऊन ह्मणतो, रांडलेंका, शिव्या त्यां जर नसतील दिल्या, तर तुझे बापानें दिल्या असतील, एकून एकच. असें ह्मणून त्याणें त्या अनाथाचा प्राण घेतला.

### तात्पर्य

जो बळवान आणि घातकी आहे, त्यापुढें आपल्ये खरेपणाचे भरंवशावर दुर्बळानें राहूं नये.



## गोष्ट ६४

### कोंबडी आणि चिमणी

एका कोंबडीनें उकिरडा उकिरतां सापाचीं अंडीं पाहिलीं, तीं उबवावीं ह्मणून दयेनें ती त्यांवर बसली. तें पाहून तिजपाशीं एक चिमणी आ

ली; आणि तापून बोलत्ये, अगे, तुला काय ह्म णावें? तूं असे दुष्ट प्राण्यांवर दया करित्ये आहे स, परंतु तुला मीं सांगत्ये हें निश्चय जाण, कीं हीं सापाचीं पिलीं, आंड्या बाहेर निघालीं ह्मण जे प्रथम तुझाच प्राण घेतील.

तात्पर्य

दुष्टास दंडच असावा; त्यावर दया करणें हें आपल्ये नाशास कारण होतें. जो जातीनें दुष्ट, त्यावर कितीहि उपकार करा, तो आपला स्व भाव सोडणार नाहीं.



गोष्ट ९५

गवळी आणि खंडेराव

कोण्या एका गवळ्याची गोजी रानांत हारप ली, त्याणें तिजविशीं फार शोध केला, परंतु सां पडेना; तेव्हां तो खंडेरावास नवस करितो, हे दे

वा, जर तूं गोजीचा चोर माझे दृष्टीस पाडशील, तर मीं तुला एक बकरा देईन. असा नवस करून अंमळ पुढें गेला तों, झाडीमध्यें एक वाघ गोजीस मारून खातो आहे, त्यास त्याणें पाहिलें; त्यावेळीं भयानें गवळ्याची गाळण झाली; आणि थरथरां कांपूं लागला. मग पुनः तो खंडेरावास नवस करितो, हे मल्लारी, चोर दृष्टीस पडावा ह्मणोन मीं तुला बकरें नवसलें होतें, त्यास तर तूं पावलास; परंतु आतां मला या वाघाच्या हातून जर सोडविशील तर मीं तुला एक सुरळी वाहीन.

तात्पर्य

जे अज्ञान आहेत ते मनांत समजतात कीं, आ ह्या करितां ईश्वर आपलें ह्मटलेलें कार्य करील; असें अज्ञान मुलास वाटतें कीं, खाऊ करितां आ ई आपलें ह्मटलेलें करील. सुज्ञ आहेत ते अ से नवसच करीत नाहींत. ज्या ईश्वरें आपणास निर्माण केलें, त्यावर विश्वास ठेवून, त्याणें जें

भोगाव्य

भोक्तव्य नेमिलें आहे तें निमुटपणीं भोगून, स्वस्थ असतात. संकट समयीं देवाची प्रार्थना करणें झाली तर, ते अशी करितात किं, हे देवा, माझें कल्याण, अकल्याण, सर्व तूं जाणता आहेस, मीं तुझा आहें, तुलाजें बरें दिसेल तें कर.

---*---

## गोष्ट ८६

## कोल्हा आणि गाढव

कोणी एके गाढवास सिंहाचें कातडें सांपडलें, तें पांघरून तो वनांत हिंडों लागला; त्यास पाहिलें ह्मणजे सर्व श्वापदें भिऊन पळून जात. या प्रमाणें त्याणें, किती एक दिवसपर्यंत धुंदाळी करून वनचरांस ठकविलें. एके दिवशीं त्याची आणि कोल्ह्याची गांठ पडली; तेव्हां तो कोल्ह्यास भेडवावें ह्मणून त्याचे आंगावर मोठे आवेशानें चालून आला; आणि सिंहा सारिखा शब्द काढूं ला

गला,

गला, परंतु तो साधतो कसा? साधला नाहीं. ते समयीं कोल्हा त्यास ह्मणतो, मामा, आतां पुरे करावें. जर आपण तेवढी जीभ आटोपते त, तर मीहि तुह्मांस सिंह ह्मणोन समजलों अ सतों, परंतु आपल्या केंकण्यावरून आपण को ण आहां तें मीं पक्कें जाणिलें.

तात्पर्य

झाडाची परीक्षा जशी फळावरून, तशी मनु ष्याची भाषणावरून होत्ये. ज्या मनुष्याची परी क्षा करायाची असेल, त्यास बोलवावें मात्र, ह्म णजे तो आपली योग्यता आपलेच मुखानें वदतो; तशी दुसऱ्याचे सांगीतल्यावरून कळत नाहीं. या साठीं ज्या पुरुषाचे मनांत आपलें मूर्खत्व लोकांस कळूंनये असें असेल, त्यास जीभ आटोपल्यांत कि ती हित आहेतें पाहा! परंतु अशी सोपी युक्ति असतां, मूर्खांस बोलल्यावांचून राहावत नाहीं. उथळ नदीचा खळखळाट फार; अर्ध भरलेला घट शब्द करितो; तसा ज्यांचा समज थोडा ते,

कोणतेही

कोणतेही गोष्टीचा सिद्धांत भडकरून बोलून जा तात; मग वस्त्र, भूषण, आकृती, यांवरून जो त्यां चे थोरपणाचा आभास पडला असतो, त्याचा निः संशय होऊन त्यांचें मूर्खत्व स्पष्ट होतें.



गोष्ट ६७

बेडूक, ज्याणीं राजा विषयीं विष्णू प्रार्थिला होता.

एके सरोवरांतील सर्व बेडुकानीं एकत्र होऊ न विचार केला कीं, आपण जिकडे तिकडे फिर तों; मनास येईल तें करितों; हें ठीक नव्हे. आ पल्ये डोईवर कोणीतरि धणी असावा; ज्याचे भ यानें सर्व आप आपल्ये मर्यादेनें राहूं. नंतर त्या बेडुकानीं आपणास राजा द्यावा ह्मणून वि ष्णूची प्रार्थना केली, ती ऐकून विष्णूस हंसें आ लें, आणि हा घ्या, तुह्मास राजा, असें ह्मणून त्याणें आकाशांतून एक लांकूड टाकिलें, तें पा ण्यावर आदळतांच मोठा शब्द होऊन पाणी उ

सळलें

सळलें; तेणेंकरून बेडूक फार भ्याले, ते त्यांक डापाशीं जाईनात. कितीकां पळांनी त्यांकूड स्थिर झालें तेव्हां, तें हालत चालत नाहीं असें पाहून, हळू हळू, ते त्याजवळ गेले; त्याजवर चढू न बसले; आणि त्याशीं खेळूं लागले. मग त्यांस असें वाटलें कीं, या राजांत कांही जीव नाहीं, तर दुसरा चांगला शोभिवंत मागावा. नंतर त्यां णीं मागुती विष्णूची प्रार्थना केली; तेव्हां विष्णूनें ग्राहामृगास पाठविलें; त्याणें येतांच बेडकांस धा डून खायाचा आरंभ केला. तो प्रळय सोसवेना तेवेळीं, बेडुकानीं गरुडाची प्रार्थना केली किं, वि ष्णूस भीड घालून दुसरा कोणी चांगला राजा पाठवावा; नाहींतर पूर्वीं ज्या स्थितींत होतों ती तरि स्थिती पुनः द्यावी. विष्णूनें गरुडमुखानें तें ऐकून घेऊन गरुडास सांगीतलें कीं, मी तें आतां करणार नाहीं. प्रथम मी जो दिला होता, तो त्यां च्या विचारास आला नाहीं, तर आतां त्यांचें कर्म त्याणीं भोगावें.

तात्पर्य

तात्पर्य

ईश्वर आपणास ज्या स्थितींत ठेवितो तीचा अनादर करून, आपण नवो इच्छूंनये; इच्छिल्यास मग जशी येईल तशी भोगावी, ईश्वरास शब्द कां लावावा? एक राजा विचारास नयेऊन, दुसऱ्याची इच्छा करितों; आणि आपण होऊन त्याचे स्वाधीन होतों; मगतो दुष्ट निपजला असतां दोष कोणाकडे?



गोष्ट ६८

दोन कोंबडे

दोन कोंबडे एके उकिरड्याचे धनीपणा करितां भांडत होते, त्यांतील एक हारला, तो पळून जाऊन बळचणीस दडून राहिला; आणि जो जिंकला होता तो एके उंचा ठिकाणावर जाऊन बसला; आणि पांख फडफडावून मोठ्या स्वरानें, मीं

जिंकिलें

जिंकीलें रे जिंकीलें ह्मणून ओरडूं लागला. इ तक्यांत तेथें जवळच झाडावर एक गरुड पक्षी भुकेला टपत बसला होता; त्याणें हळूच खालीं झेंप घालून, त्या कोंबड्यास उचलून नेलें. तें पा हून लिकाला होता तो कोंबड बाहेर निघाला, आणि कोंबड्यांजवळ येऊन आपला पराक्रम व र्णन करूं लागला.

तात्पर्य.

जय अथवा पराजय प्राप्त झाला असतां, ह र्ष किंवा विषाद करणें हें मूर्खत्व. संपत्तींत अ सतां उन्मत्त होऊन गर्वानें फुगणें; किंवा विपत्तीं त धैर्य सोडून केवळ दीन होणें, तेंहि तेंच. तर दोहीं अवस्थांतहि जो चित्ताची समता राखतो, तोच थोर ह्मणावा; तोच ज्ञानी; ज्यास समजतें कीं, सुख दुःख, जय पराजय, हीं एकामागें ए क मनुष्याच्या पाठीमागें लागलींच आहेत.

## गोष्ट ९९

### हिमवायू आणि सूर्य

एके समयीं हिमवायू आणि सूर्य दोघे भांडूं लागले; वायू ह्मणे माझी शक्ती अधीक; सूर्य ह्मणे माझी. इतक्यांत एक वाटसरू घेंगडी पांघरून तिकडून जातहोता, त्यास पाहून उभयतानीं तोड काढली कीं, जो याचे आंगावरून घेंगडी उडवील तो श्रेष्ठ. तेसमयीं पहिल्यानें हिमवायू पुढें सरसावला. तो घेंगडी उडवावी ह्मणोन जंव जंव मोठ्यानें वाहूं लागला, तंव तंव वाटसरूनें ती अधीकाधिक आंगास लपेटिली. शेवटीं वायू थकला. मग सूर्य पुढें झाला; त्याणें मुळीं असें केलें कीं, आकाशांत जीं थंडीचीं अभ्रें पसरलीं होतीं तीं वितळवून, थंडीस पळविलें; मग हळूच आपलीं उष्ण उष्ण किरणें, त्या वाटसरूच्या आंगावर घातिलीं; तेणें करून तो कांहिकावेळानें, उबार्‍यानें विव्हळ होऊन, त्यास तो साहावत ना

होता झाला; तेसमयीं त्यानें आंगावरील घोंगडी टाकिली; आणि जवळचे राईंत जाऊन शीतळ छायेस बसला.

तात्पर्य

ईश्वरें मनुष्यमात्राचे प्रकृतिमध्यें असें कांहीं ठेविलें आहे किं, जेणेंकरून आपण दुसऱ्याचा बळात्कार साहूंच नये. याकरितांच, आपण दुसऱ्याचे हातून, एकादी गोष्ट करवायाविषयीं जितका जितका बळात्कार करायास लागतों, तितका तितका, त्याचेठायीं ती गोष्ट नकरण्याविषयीं, आग्रह मात्र दृढ करितों. कडू शब्द आणि जाच, त्हदयास थिजवून जसे हट्टी करितात; तसेच कोमळ शब्द, आणि शांत आचार, हे त्यास वितळवून उपदेश ऐकायाविषयीं अनुकूळ करितात. ज्यास फार दिवसांचे अभ्यासानें एकादे गोष्टीचा वळकट ग्रह झाला असतो, ती त्याची गोष्ट आपण अकस्मात बळात्कानें खोडून टाकूं लागलों असतां, त्यास ती प्राण देऊनहि राखण्याविषयीं

षयीं अभिमान पडतो. सारांश, हिमवायू सारिखा जो विरोधी उपचार, तो मनुष्यास स्वमत दृढ धरायास लावितो; आणि जो सूर्याचे उनासारिखा उग्र नसून जिवट, तो युक्तीनें योजिला असतां, आपलें इच्छिलें सिद्धीस नेतो.

---

## गोष्ट १००

### दाई आणि लांडगा

एके रात्रीस, एक हट्टी मुलगें रडून मोठा कोल्हाळ करीत होतें, त्यास उगें करावें ह्मणून दाईनें नानाप्रकार केले, परंतु तें ऐकेना. शेवटीं, तीणें त्यास सांगीतलें कीं, जर तूं उगें राहिलें नाहींस तर, तुला दारीं लांडगा आला आहे त्याचे स्वाधीन करीन. तेवेळीं, एक लांडगा दारीं खराच आला होता, त्याणें ते शब्द ऐकिले; आणि दाई, बोलिल्या प्रमाणें करील या विश्वासावर, वा

ट पाहात फारवेळ तिष्ठत राहिला. शेवटीं, मुज केंं रडतां रडतां थकलें, तें झोंपीं गेलें; आणि त्यां डग्यास बापुड्यास उपाशीं, रानांत परत जागाचें पडलें. त्यास वाटेंत कोल्हा भेटला त्याणें विचा रिलें, बाबा, तुझा काय समाचार आहे? आज तुझा पांय कां उचलत नाहीं? लांडगा उत्तर क रिता, गड्या, तें कांहीं पुसों नको: मीं वेडा, दा ईचें बोलणें खरें मानून फसला गेलों.

तात्पर्य

यागोष्टीचें तात्पर्य, नुसत्ये बोलण्यावरच वि श्वास ठेवूनये, असें काढून, कित्ती एक कवी तें के वळ बायकांवरच लावितात; परंतु तें नीट दिस त नाहीं. बऊत करून बायका चंचळ असता त, किं, ज्यांचे बोलण्यास धरनाहीं; परंतु कित्ती एक अशाहि आहेत, किं, बोलिलें वचन पाळिता त. बायकां मध्यें असा कांहीं दुर्गुण आढळत ना हीं किं, जो पुरुषांत नाहीं. तर, यागोष्टीचें ता

त्पर्य

त्यर्थ इतकें दिसतें, कीं, वाचको असो किंवा पुरु ष असो, कोणाचेही नुसत्ये वचनावर विश्वास ठेवूं नये: जेंजें तीं बोलतील तें त्यांपासून घडोन येईल, कीं नाहीं, याचाहि विचार करावा.

—०—*—०—

गोष्ट १०१

कांसव आणि गरुड पक्षी

एक कांसव भुईंवर चालतां चालतां कंटाळलें; त्यास असें वाटलें कीं, आकाशांतून सृष्टीचा चमत्कार कसा दिसतो तो पाहावा. त्याणें पक्ष्यांस सांगीतलें कीं, जो कोणी मला आकाश पंथानें फिरवील, आणि सृष्टीचें कौतुक दाखवील, त्यास मी, ज्या मला पृथिवीचे पोटांतील रत्नाच्या खाणी ठाउक आहेत त्या, दाखवीन. गरुड पक्ष्यानें तें मान्य करून, कांसवास आकाशांतून पृथ्वीवरील सर्व चमत्कार दाखविले. मग त्यास ह्मणा

ला कीं, आतां तुझ्या रत्नाच्या खाणी कोठें आहे त त्या मला दाखीव. तेसमयीं कांसव गांगरून वे ड्याचें सोंग घेऊं लागलें; तें पाहून गरुडास क्रो ध आला, आणि त्याणें त्याचे नाजूक ठिकाणीं आ पलीं नखें रोवून त्यास तात्काळ मारून टाकि लें.

तात्पर्य

प्रतिज्ञे प्रमाणें केलें नाहीं तर, त्यांत हाणी आ हे. थोर आहेत त्यांची प्रतिष्ठा जात्ये. साधा रणास प्रतिष्ठा जाऊन दुखापत होत्ये. आणि जो केवळ लबाड, दुसऱ्यास ठकवायास पाहातो, त्या चेंतर सर्वस्व जाऊन, समयीं प्राणासहि धक्का ब सतो.

---

गोष्ट १०२

वनदेव आणि पांथिक

कोणीएक वनदेव, हिंवाळ्याचे दिवसांत, अर ण्यामध्यें फिरत होता; त्यास एक पांथिक दृष्टि प

डला;

डला; तो थंडीनें अर्ध मेला झाला आहे असापा हून, वनदेवास दया आली; आणि तो त्यास ह्म णूं लागला, बाबा, या जवळचे पर्वतांत माझी गुहा आहे, तेथें येशील तर मीं तुझें हिंव पळवीन. मग ते उभयतां गुहेंत जाऊन बसले; तेथें आगटी पेटविली होती, तिच्या योगानें मोठा उबारा झा ला होता; तथापि तो पांथिक, थंडीनें कुड कुडून, बोटें गारठलीं होतीं तीं फुंकूं लागला. वन देवानें त्यास पुसलें, तूं असें कां करितोस? तो ह्म णाला हात थंड झाले आहेत त्यांस ऊब आणा यासाठीं. वनदेव मनुष्यांत वागणारा नव्हे, त्या सें तो पांथिकांत, थंडास ऊन करण्याचा गुण पा हून, आश्चर्य केलें; आणि त्यास गुणी मनुष्य समजू न, त्यापुढें कांहीं कंद मूळ फळें शिजवून फराळा स ठेविलीं; तीं फार ऊन होतीं ह्मणून पांथिक त्यांसहि फुंकोंलागला. तेव्हां वनदेवानें मागती त्यास विचारिलें, रे, तूं हीं कां फुंकितोस? तो ह्म णाला, ऊन आहेत तीं थंडकरायासाठीं. तें ऐ

कोन

कोन वनदेवास क्रोध आला, आणि तो त्या पां थिकास बोलला, रे, तुझे सारिखा दुर्गुणी, जो ए काच तोंडानें थंडास ऊन, आणि उष्णास थंड क रणारा, त्याशीं मशीं संबंध नसावा: असें ह्मणो न त्याणें त्या पांथिकाचीं खवाटें धरोन त्यास गु हे बाहेर झोंकून दिलें.

## तात्पर्य.

जे पुरुष एका तोंडानेंच, निंदा आणि स्तुती, अ सें विरुद्ध आचरण करितात, त्यांचा सज्जनानीं कंटाळा करणें योग्य आहे. दुसरे कितीक आ हेत ते, आपलें कार्य साधायासाठीं, जें गोड ला गेल, जें ऐकणाराची आशा वाढवील, तें बोलत असतात; मग कार्य साधलें ह्मणजे, त्याच तोंडा नें त्यास अगदीं निराश करून सोडितात; हें चां गलें नव्हे: या दुर्गुणानें थोर थोर मनुष्य हलकेपणा पावून अशांत पडले आहेत. ह्मणोन जो असें बो लतो, आणि तसेंहि बोलतो, अशा पुरुषाशीं जे व्ह थोडा प्रसंग असेल तंव बरें.

गोष्ट

## गोष्ट १०३

### टकल्या शिलेदार

कोणी एक शिलेदाराचे डोईचे केंस, वयपरत्वें सर्व गळून पडले, आणि तो टकल्या झाला. तो आपली खोड लपवावी ह्मणून तो टोप घालीत असे. एके दिवशीं तो मृगयेस जात असतां अकस्मात वाऱ्याचा सोसाटा येऊन डोईंतील टोप उडून खालीं पडला. तेसमयीं बरोबर दुसरे कितीक होते ते, त्याची थट्टा करून हसूं लागले. तें पाहून शिलेदारानेंहि मोठ्यानें हास्य केलें; आणि ह्मणूं लागला, अहो, माझे होते ते माझे डोईवर राहिले नाहींत; मग दुसऱ्याच्यांनीं कसें बरें राहावें?

### तात्पर्य

खोडखोर मनुष्य दुसऱ्यास आणि आपल्यासहि सुखदायक होत नाहीं; खोडीवांचून कोणताहि

पुरुष नाहीं. परंतु सर्वदा भांडणाचें निमित्त सो धित असावें, अथवा छिद्रपाहून दुसऱ्यास दोष देत असावें, ही ज्यास खोड आहे, तो कोणासही आवडत नाहीं: या एका दुर्गुणानें त्याचे सर्व गुणा चा लोप होतो. यासाठीं, जो पुरुष आपलें चित्त स्वस्थ ठेवायास इच्छितो, आणि उत्तम मनांत किं लो कानीं आपणावर प्रीती करावी, तो कलहाचें नि मित्त सोधित नाहीं: दृष्टीस पडलें तरि, तेथें ल क्ष ठेवित नाहीं: आणि जें लक्षांत यावेंच असें असतें, तें, विनोदावर घालितो. कितीकांस अशी खोडी असत्ये कीं, दुसऱ्याची खोड काढावी; मग तो जंव जंव संतापेल, तंव तंव त्याणीं समाधान पाव त असावें, आणि त्याचा अधीक अधीक मर्म भे द करीत असावा; त्यास, असें दुष्ट अंतःकरणी पु रुषांचे दांत पाडायास, उपाय हाच; किं, आप ण न चिडतां त्यांचे बोलण्याचें कौतुक करून, ती गोष्ट विनोदाखालीं न्यावी. समयीं असेंहि क रावें, किं, दुसरा आपला उपहास करी तों, त्या आगोदर आपला आपणच करावा.

गोष्ट २०४

मोर आणि बगळा

एके समयीं मोरानें बगळ्यास पाहून आपला पिसारा उभा केला; आणि हा कोणी तुच्छ प्राणी आहे, असें मनांत आणून, त्यापुढें आपले सोनेरी रंगाचे पिसांची शोभा दाखवूं लागला. त्याचा गर्व उतरावा ह्मणून बगळा त्यास ह्मणतो, अरे, जर सुंदर पिसांवरच थोरपणाचें प्रमाण आहे, तर तुह्मां मोरांची जात थोर खरी; पण मला असें वाटतें कि, भुईंवर चालून मुलांचें खेळणें जें व्हावें, त्यापेक्षां, आकाशीं फिरायास समर्थ असावें, यांत थोरपणा अधिक आहे.

तात्पर्य

आपणांत एकादा गुण आहे, तो दुसऱ्या मध्यें नसला ह्मणून त्यास तुच्छ लेखावें, अथवा दुखवावें जर, तर दुसऱ्यामध्यें जो गुण आहे तो आपणांत

णांत नाहीं ह्मणोन, त्याणेंहि आपल्यास तुछ कां मानूं नये? सर्वगुणसंपन्न कोणी असत नाहीं; या स्तव कोणी कोणास हलकें लेखणें ही मूर्ख सम जूत. वर सांगीतल्ये गोष्टींत, मोरानें आपणास बा हेरचे शोभेवरून मोटेपणा मानिला; त्यास, मुज्ञ आहेत ते बाहेरचे भूषणाचा लेखा करित नाहीं त. जीं मुलें, जे अज्ञान लोक आहेत, त्यांस मा त्र बाह्य रंग मोह पाडूं शकतो; परंतु शाहाणे आ हेत ते आंतले गुणावर पुरुषाचें मोल करितात: ज्या पुरुषांचे अंतरीं सद्वासना; ज्यामध्यें लीनता दिसल्ये; अशा पुरुषांस ते थोर ह्मणतात. शालजो डी, जरीचीं पांघुरणें, रत्नाचे अळंकार, यांत कां हीं थोरी असली तर, तें त्या वस्तूचे करणारास भूषण: त्यांत आंगावर घेणारास काय आहे? ह्म णायाचें तात्पर्य इतकें कि, जे पुरुष, शालजोडी आदिकरून वस्तूचे योगानें आपलेकडे संभावित पणा ओढून आणितात, ते आपणास ठकवितात असें समजावें.

## गोष्ट १०५

## दोघे वाटसरू आणि आस्वल

दोघे पुरुष देशांतरीं जावयास निघाले, त्यांणीं परस्पर आणभाष केली कीं, वाटेंत जड अवघड तर, एकमेकानें एकमेकास सोडूंनये. पुढें, ते एका अरण्यांतून जात असतां, एक आस्वल त्यांच्या आंगावर धांवून आला; तेसमयीं त्यांतील एक जण, पातळांगी चपळ होता, तो झडकर पळून झाडावर चढला; दुसरा, भारी आंगाचा होता, त्याच्यानें पळवेना; तेव्हां तो आपला श्वास कोंडून भुईंवर निचेष्ट निजला. आस्वलानें त्याजवळ येऊन त्याचे कानाशीं हुंगून पाहिलें, आणि हें मेलेलें मढें आहे असें समजून, कांहीं उपद्रव नकरितां, तो माघारां गेला. आस्वल गेल्यावर, झाडावरचा खालीं उतरोन त्याकडे हंसत हंसत पुसतो, मित्रा, तो आस्वल तुला काय बोलला? कांकीं मीं झाडावरून पाहात होतों, तो तुझे कानाशीं लागोन कांहीं सांगत होता.

त्याणें उत्तर केलें किं, आसवानें मला हें सांगीत लें कीं, तुझे सारिखे लुच्चांचे वचनावर अतःपर विश्वास ठेवूं नको.

तात्पर्य

आपणास अगत्य नसतें तेव्हां लोक पुष्कळ म मता दाखवितात, आणि भरवशाचीं बोलणीं बो लतात; परंतु त्यांत अडचणीचे वेळेस कामास प डणारा असा सांपडणें फारकठीण आहे. जो लोकरीती जाणतो तो पुरुष, असत्ये भाषणावर भरवंसा ठेवीत नाहीं. नुसतें बोलणें बोलणारानें बोलूंनये, आणि ऐकणारानेंही त्यावर विश्वासूं न ये; त्यांत उभयतांचाही तोटा आहे.

—०—※—०—

गोष्ट १०६

द्वाड कुत्रा

कोणी एका मनुष्याजवळ कुत्रा होता, तो आं गावर धांवून ज्यास त्यास चावत असे, ह्मणोन

त्याचे

त्याचे धन्यानें त्याचे गळ्यास, एक, लोढणें बांधिलें. तो त्या कुत्र्यास मोटी प्रतिष्ठा वाटून, तो शेजा रचे कुत्र्यांचा तिरस्कार करूं लागला; आणि त्यांस आपले जवळ उभा करीत नाहींसा झाला. ते व्हां त्यामध्यें एक म्हातारा होता, त्याणें त्यास म्ह टलें, बाबा, तूं ही गळ्यांतील वस्तू पावला आहे स इतक्यावरून, आपल्ये जागीं आपणास मोटा मोजित असलास, तर मोज; परंतु, ज्याणें ही तुझ्या गळ्यांत बांधिली आहे, त्याणें ही प्र तिष्ठेची खूण म्हणून बांधिलीं नाहीं, अप्रतिष्ठेची खूण म्हणून बांधिली आहे.

तात्पर्य

कितीएक खोडकर लोक असे अभिमानी, आणि अल्पसमजाचे असतात. कीं, त्यांचे ओळखीची एका दी खूण त्यांमध्यें ईश्वरें ठेविलीं असल्ये, तीचा ते आपले मनासारिखा अर्थकरून, आपल्येठायीं आ पण थोर असें मोजितात. ज्यास चौघांत नीट बोलतां येतनाहीं, ज्याचें बोलणें ऐकून लोक ह

सतात,

सतात, तो त्याचें कारण असें लावितो कीं, मा झी बुद्धी मोठी विशाळ, एकदांच अनेक कल्पना सु चतात, त्यामुळें असें होतें. मूर्खत्वामुळें, अथ वा चांगली शिक्षा नाहीं ह्मणोन कंटाळा करून, लोक, ज्यापुरुषाशीं, गांठ पाडित नाहींत; तो, त्या चें कारण असें लावितो कीं, माझें तेज साहात नाहीं ह्मणोन, मजजवळ कोणी येतनाहींत. त्या स असले जे आहेत ते, अमळ विचार करून पा हातील तर, त्यापासून त्यांचा बहुत लाभ हो ईल.

---

## गोष्ट १०७

### उनाड बोकड

एक उनाड बोकड स्वछंद फिरत असे. एके दि वशीं तो बैलास नांगरीं जुंपिलेला पाहून, त्यास म्हणू बोलतो; रे, तूं आपल्या धन्या साठीं मा नेवर जुंकड घेऊन, अष्टोप्रहर नांगर वोढितोस,

याबरून

यावरून मला असें दिसतें कीं, तूं कोणी कावा डी, हलका प्राणी आहेस; तुला पराधीनपणाच गोड वाटतो; नाहींतर तूं असें करितास ना. पा हा मीं कसा काळ घालवितों तो; मी माझे इ छेस येईल तिकडे जातों, शीतळ छायेस बसतों; उडतों; नाचतों; बागडतों; तृषा लागल्ये तेव्हां नि र्मळ झऱ्याचें पाणीं पितों; आणि तुला मळकें पा णीहि मिळायाची भ्रांत. बैल तें ऐकोन घेऊन खालच्या मानेनें उगाच आपलें काम करूं लाग ला. पुढें थोडकेच दिवसानीं, त्या गांवचे देवी ची यात्रा आली, तेदिवशीं, बोकडाचे धन्यानें बो कडाचे गळ्यांत फुलांच्या माळा घालून त्यास श्टंगा रून देवीस बळी द्यायाकरितां नेलें, आणि त्याचे मानेवर सुरा ठेविली आहे; त्या समयीं, तेथें तो बैल येऊन त्याचे कानांत ह्मणतो, रे मूर्खा, तुझे स्वछंदपणाचा शेवट कसा झाला तो पाहिलास ना? तुला आजपर्यंत जीवंत ठेविला होता तो ह्मलक्याकारीं बरें. तर तूं आतां मला सांग, तु झी अवस्था चांगली कीं माझी.

तात्पर्य

## तात्पर्य

दुसरा विपत्तींत असतां त्यास टोणे मारणें, हें जो अधम, जो मूर्ख, जो उन्मत्त, त्याचें काम. हें काळचक्र सदां फिरतें आहे; कोणे समयीं त्या ज्या विपत्ती यास येऊं शकत; आणि याच्या संप त्ती त्यास जाऊं शकत. दुसरेंहि या गोष्टींत सुचविलें कीं, जे स्वच्छंद फिरतात, मनास मानेल तें करितात; त्यांचा परिणाम वाईट होतो. आणि जे उद्योगी, ते आपले उद्योगाचें फळ भोगून सुख पावतात. जे निरुद्योगी, निरंकुश पुरुष आहेत, त्यांचा चरितार्थ चालत नाहीं; मग ते लोकांस ठकवूं लागतात; लोकांवर बळात्कार करितात; चोऱ्या करितात. अशीं अशीं कर्में करून आपण वैभव भोगितों ह्मणून; तें गृहस्थ मनुष्यांस हंसेत, कीं, ते त्यां सारिखे करीत नाहींत; आणि आपले श्रमाचें जें मिळेल तितक्यावरच चरितार्थ करून असतात; परंतु चोर, लबाड, ठक, यांचे कपाळीं परिणामीं बंदिशाळा, अथवा शूळ.

तो

मी त्यांचा परिणाम पाहून, उद्योग निष्टास, आ पली स्थिति चांगली वाटेलच. दुसरें, जे स्वैर आ हेत ते, रिकामपणा मुळें व्यसनाचे स्वाधीन हो तात; त्यांचे खाण्यापिण्यांत आणि सर्व व्यवहारां त कांहीं बंद राहात नाहीं; तेणेंकरून ते अका ळमृत्यूसहि पात्र होतात.



गोष्ट १०८.

चिता आणि कोल्हा

एके समयीं चित्यास असें वाटलें, किं, माझे कातडीवरील विचित्र आणि सुंदर टिपके पाहा तां, देखणेपणा विषयीं माझी बरोबरी सिंहहि क रूं शकत नाहीं, मग इतरांची काय कथा? मग तो पशुमात्राचा तिरस्कार करूं लागला. त्यास कोल्हा म्हणाला, बाबा, तूं फार चुकतोस; तर मी

सांगतों

सांगतों हें खरें मान, किं, ज्यांतील सद्गुणाचे भूषणा बांचून, बाहेरचे भूषणास लुब्ध आहेत ते, भूषण ह्मणत नाहींत.

तात्पर्य

जो सुंदर आहे, तो, मी सुंदर असा गर्व न करितां जर वर्तेल, तर त्याचा सुंदरपणा त्यास फार शोभा देईल. गुणवान आणि सुंदर आहे त्याच खोची कीर्ति वाढत्ये.

---*---

गोष्ट १०९

बोका आणि कोल्हा

एके समयीं बोका आणि कोल्हा हे दोघे, अरण्यांत एके झाडाचे बुडीं, राजकारस्थानप्रकरणीं बोलत बसले होते; तेथें कोल्हा ह्मणाला, बोकोबा, कदाचित एथें आपणावर अवघड प्रसंग पडला असतां, मी तर मला सहस्र युक्ती करून निभावून नेईन; परंतु तुझें गड्या मला कठिण दिसतें.

बोका

बोका ह्मणाला,-गड्या, मी एक युक्ती मात्र पक्की जाणतों, तितकी चुकली तर मग माझी बरी गत नाहीं. कोल्हा ह्मणाला, तर बाबा, तुझी चिंता मला फार वाटत्ये. बापुड्यारे, तुला एकदोन युक्ती मी तरी शिकविल्या असत्या. पण जाणतोस? आजचा काळ असा आहे, किं, ज्याचें त्याणें आपलें पाहावें. बरें तर आतां रामराम, आह्मी येतों. इतकें बोलून तो जायास निघाला तंव, मागून हांहां ह्मणत पारधी कुत्र्यांस घेऊन आले; ते समयीं बोक्यास झाडावर चढायाची चांगली युक्ति ठाऊक होती, ती करून त्याणें आपला जीव वांचविला. आणि कोल्ह्यास सहस्र युक्तींतून त्यासमयीं एकही उपयोगीं पडली नाहीं; तो घा बरून पांच च्यार पाउलें धांवताहे तों, लगट करून कुत्र्यांनीं त्यास पाडाव केलें.

## तात्पर्य

दुसऱ्यापेक्षां माझें शाहाणपण अधिक, ह्मणून जो भाव धरितो, तो बहुत करून जातीचा

मूर्ख असतो. बुद्धीवानानें आपल्ये बुद्धीचा प्रसंगीं उपयोग करावा, लोकांजवळ बढाई हाकून त्यांस कां उगाच कंटाळा? एकच बुद्धि परंतु ती ज्यास चांगली ठाऊक आहे, आणि समयीं सुचत्ये आहे, तर त्यास तोऐंकरून जो तरणोपाय होईल, तो सहस्र बुद्धीचे धन्यास होणार नाहीं. तो विचार करितां करितां कुंठित होऊन, शेवटीं फसला जाईल. तसेंच; एकच विद्या पण चांगली येत्ये आहे, आणि समयीं वागती आहे तर, ती कामाची; अनेक विद्या येतात पण समयास एकहि उपयोगीं नाहीं, तर त्यांपासून दुःख मात्र.

---

गोष्ट ११०

ससाणा आणि बुलबुल

एक बुलबुल पक्षी तमाल वृक्षावर बसोन, सुस्वर गायन करीत होता; त्या नादानें सर्व अरण्य नादावलें. तो शब्द ऐकोन, तेथें जवळच

एक

एक भुकेला ससाणा फिरत होता, त्याणें त्या प
क्ष्यावर झडप घालून त्यास पांयाचे नखांत ध
रिलें, आणि पुढें खाणार तंव, तो त्यास ह्मणतो;
रेरे, मजवर दयाकर; हें निष्ठुर कर्म तुला यो
ग्य नाहीं; पहा मी तुझा काहीं अन्याय केला
नाहीं; मला खाऊन तुझे पोटास एकहि घांस पु
रता होणार नाहीं. तर कोणी तरि एकादा मो
टा पक्षी मार, त्यांत तुझी कीर्तिहि होईल, आ
णि पोटहि भरेल. मला गरीबाला जाऊंदे. स
साणा त्यास ह्मणतो, हांहां बाबा, तुला हावें ति
तकें बोल; मी आज सगळे दिवसाचा उपवासी आ
हें, आणि दैववशात तूं माझे हातीं लागला आ
हेस, तो ह्मणतोस किं मला सोडूनदे, आणि दु
सरा कोणी मोटा पक्षी मार! तर तसें केलें
असतां लोक वेडें कोणास ह्मणतील बरें?

तात्पर्य

उद्योगी पुरुष आहेत ते अधिक उणे लाभा
कडे पाहात नाहींत; जें योगास आलें त्याचा अं

गीकार

गीकार करितात. काळाची गति समजत नाहीं; सहस्र प्रकारचीं विघ्नें येऊन मध्यें पडतात; मनुष्याच्या बुद्धि चंचळ; देह क्षणभंगुर; अशा असो यी पाहूनहि, प्रस्तुत लाभ सोडून अप्रस्तुतावर भरवंसा धरितो, तो मूर्ख शेवटीं पश्चात्ताप पावतो.

---

## गोष्ट १११

## लांडा कोल्हा

एक कोल्हा लोखंडाच्या सांपळ्यांत शेंपुट अडकोन सांपडला असतां तो तें तोडून पळाला, आणि मनांत हर्ष मानितो किं, प्राणावर आलें होतें तें शेंपुटावरच गेलें. मग तो आपल्या मंडळींत जाऊं लागला, ते समयीं, त्यास लांडेपणाचा मोठा खेद होऊन मनांत ह्मणतो, किं मी मेलों असतों तर बरें होतें; परंतु ही अपेक्षा

फार वाईट. असो, जें झालें त्यास उपाय ना हीं; तर आतां हेंच साजरें कसें करावें? अशा योजना करीत असतां, त्यास एक युक्ति सुचली, किं आपण सर्व कोल्हेमंडळीस एकत्र करावें; आणि सांगावें किं, मी आपली शेंपटी तोडून टाकून ही भूषणाची नवी तऱ्हा काढिली आहे: ही चांगली प्रतिष्ठित आहे, ह्मणोन तुह्मां सर्वांस घ्यावयास योग्य आहे. असें योजून मग तो कोल्हे मंडळीस मिळवून ती पुढें नवे परी विषयीं मोठें वाक्पांडित्य करूं लागला; ह्मणतो, अहो या शेंपट्यां पासून कांहींच हित नाहीं: त्यांतहि कोल्ह्याची शेंपटी ह्मणजे केवळ ओझेंच: यासाठीं शेंपटी वांचून असल्यानें एक तर भूषण; दुसरें, पळणेंसांवरखें झाल्यास उतावळीनें करितां येतें. मी असें हें पहिल्यानें आपल्ये मनांत आणून, मग आंगीं अनुभवून पाहिलें तंव खरेंच. शेंपूट तोडून टाकिलें तेव्हांपासून मी फार सुखी आहें; असें सुख मी आजन्मांत पावलों न होतों. असें

बोलून

बोलून तो सर्वांचे तोंडाकडे पाहूं लागला किं, माझे चेले यांत किति होतात; इतक्यांत त्यांतील एक म्हातारा कोल्हा; चोरकर्मांत फार निपुण होता, तो त्याची ती ठकविद्या समजून मान वांकडी करून उत्तर करितो; पंडित बावा, आतां पांडित्य पुरे करावें: आपल्यास शेंपटी टाकून हित झालें असेल यांत संशय नाहीं, परंतु तसा प्रसंग आह्मावर ज्या दिवशीं पडेल त्या दिवशीं आह्मीहि टाकूं.

## तात्पर्य

सर्व लोक जर कोल्ह्या सारिखे सावध असते तर, उगीच कोणी कोणाची काढलेली तऱ्हा घेते ना. बहुतेक तऱ्हा ज्या वस्त्र, प्रावरण, अलंकारादिकांत, अथवा खाण्याचे प्रकारांत आढळतात, त्यांचीं वास्तविक कारणें पाहूं गेलें असतां, मनुष्यांनीं पोषण मिळवाया करितां, किंवा आपणांत एकादी खोड आहे, ती लपवाया करितां त्या काढल्या असतात.

गोष्ट

## गोष्ट ११२

## म्हातारा आणि मृत्यु

एक जर्जर म्हातारा पुरुष सर्पण आणाया करितां रानांत गेला होता; तेथें काटक्या मिळवून त्यानें त्यांची एक मोळी बांधिली; ती डोईवर घेऊन मोटे कष्टानें पाउलें टाकीत टाकीत, घरीं येतो आहे, तों वाट लांब, आणि डोईवर ओझें भारी, तेणेंकरून तो थकून ओझें टाकोन खालीं बसला. तेवेळीं तो मृत्यूस म्हणतो; हे प्राणिमात्रांच्या विसांव्या, तूं ये, आणि मला एकदां या सर्व दुःखांतून सोडीव. मृत्यूनें तें ऐकतांच तो म्हाताऱ्यापुढें येऊन उभा ठाकला; आणि त्यास विचारितो बाबा, तूं माझी आठवण कां केली होतीस? त्या बापडे म्हाताऱ्यास ठाऊक नव्हतें कीं मृत्यु इतका जवळ आहे; त्याची ती विक्राळ मूर्ति पाहूनच, म्हाताऱ्याची शुद्धि गेली; मग कांहिं कांळानीं सावध होऊन कांपत कांपत उत्तर करितो,

मृत्यु

मृत्यु दादा, मी अशक्त, माझे डोईवरची भारी अवचित खालीं पडली; ती उचलून देशील, ह्मणू न रे दादा, मी तुझी आठवण केली होती; दुसरें कांहीं काम नाहीं; खरोखर, इतकेंच रे दादा काम होतें; आणि यांत मीं तुशीं सलगीकेली ह्म णून तुला राग आला असेल तर मी तुझे पां यां पडतों; मला क्षमा कर; आणि आला आहे स तसा कृपा करून माघारीं जा.

तात्पर्य

लोकांची ही रीतच पडली आहे कीं, मृत्यूशीं थट्टा करीत असावी. अल्प स्वल्प संकटासहि ह्म णत असावें, किं मरण येतें तर बरें होतें. परंतु हें सर्व मृत्यु दूर आहे तंवच; जवळ आला असतां तेच पुनः संसार ओझें घ्यावयास सिद्ध होतात; आणि कांहीं दिवस आणिखी जावे ह्मणून आशा वाढवितात. हाडांचा पांजरा शेष राहिला आ हे, आणि सहस्र विपत्ती भोगिताहेत, असे ह्मात

त्यांचीहि

यांचीहि वांचायाविषीं इतकी आवड; मग जे ता रुण्याचे भरांत आहेत, त्यांची किती असावी? सा रांश, मृत्यु हा खचित होणार जाणून, तो आला असतां जो त्यास भीत नाहीं, आणि अनुसरतो; तो जाणता पुरुष ह्मणावा.

---

## गोष्ट ११२

### सकाम सिंह

कोणी एक रानकऱ्याची लेंक फार सुंदर हो ती, तीस पाहून एक सिंह मोहित झाला; आणि त्यास असा दारुण काम उत्पन्न झाला कीं, ती स्त्री प्राप्त होय्ये तरच जीव वांचतो, नाहींतर ना हीं. मग उशीर न लावतां त्याणें मन मोकळें क रून ती गोष्ट तिचे बापाजवळ केली. आणि त्या स ह्मणाला, तूं मला आपला जांवई कर. तें वेडें भाषण ऐकून, बापानें मनांत विचार केला, कीं मी जर यास नाहीं ह्मणतों, तर हा मला

आतां फाडून खाईल; तर, होय ह्मणून याला युक्तीनें फसवावें. मग त्याणें सिंहास सांगीतलें, सिंहोबा, बरी गोष्ट आहे; मी तुह्मास मुलगी देतों; परंतु मला तुह्मापाशीं कांहीं बोलायाचें आहे. माझी मुलगी फार नाजूक, आणि तुमचे दांत व नखें फार तिखट आहेत, त्यांपासून तिला व्यथा होईल, त्यास बरें कसें करावें? तुह्मी ह्मणाल कीं त्याविषयीं मी जपेन, तर तें तुह्मी आपल्येकडून केलेंत जरि तरी तिचे मनातलें भय उडणार नाहीं: तीस भय असेल तुमचा विलास तुह्मा उभयतांसही सुख देणार नाहीं; याचा विचार करा. तर, माझें ह्मणणें इतकेंच आहे कीं, तुह्मी तितके दांत व नखें मला काढूंद्यावीं, ह्मणजे मी मुलगी तुह्मास अर्पण करितों. सिंह कामानें वेडा झाला होता, त्याणें ह्मटलें कांहोईना? मग, रानकऱ्यानें लागलेच त्याचे दांत आणि नखें काढून घेतलीं. नंतर एक मोठा बडगा आणून त्याचे कपाळावर हाणिला; तेणेंकरून तो तत्काळ मृत्यु पावला.

तात्पर्य

तात्पर्य

जे कामाचे स्वाधीन झाले, ते पुरुष महा शूर असोत; बळवान असोत; नाश पावतीलच. तसे च; जे शत्रूचे गोड वचनांनी मोह पावून आप ल्ये जिव्हाळ्याच्या वस्तू त्याचे स्वाधीन करितात, ते मग सर्वस्वास मुकतात.



गोष्ट ११४

सिंहिण आणि कोल्ही

एके दिवशीं सिंहिण आणि कोल्ही या उभय तांची गांठ पडली. तेसमयीं श्वापदांमध्यें कोण त्ये जातीस अधीक वीण आहे, यावर गोष्ट नि घाली त्या अवसरीं कोल्हीनें सिंहिणीस एकवि लें कीं, विणी विषयीं तर कोल्ह्यांची बरोबरी को ण करणार होतें? ह्मणालीकीं, आह्मीं वर्षांतून अ धीक नाहींतरी, एकवेळही वितोंच; आणि प्रवि

खेपेस अनेक पिलीं घालितें. परंतु कितीएक जाती अशा आहेत कीं, खेपेस एकच पिलुं पस वतात, आणि तेंही कदाचित सगळे जन्मांत एक वेळ; असें असोन पण त्यांस गर्व किती? त्या ति नक्या वरच नाक वर करून दुसरे कोणास गणी त नाहींत. सिंहिण मनांत समजली कीं कोल्ही आपल्यास लाऊन बोलली. मग ती तीस ह्मण त्ये, अगे ऐकल्येस; तुह्मी अधीक बाळें पसवतां, हें पाहातांचीं वास्तवीक आहे; पण तीं कोण? कोल्हीं; आणि आह्मीं एकच पसवतों; परंतु मनांत आण कीं, त्या बाळकास, सर्व श्वापदांचा राजा असें ह्म णताहेत.

तात्पर्य

जेजें आपल्ये पासून निपजतें, त्याचें मोल त्या चे संख्ये वर करूं लागूं नये; जातीवर करावें. आपण थोडकेच उद्योग केले, परंतु ते जर असे आ हेत कीं, सांप्रत आहेत त्यालोकांस, व पुढें होणा र त्यांसही, त्यापासून मोठा उपयोग होणार तर

तेच

तेच प्रशंसेस योग्य होताहेत. नाहीं तर, पुष्कळ कोल्ह्या कुतऱ्यांची वीण होऊन देशास उपद्रव मात्र जसा, तसेते होत. दुसरें या गोष्टीचें तात्पर्य; कित्ती एक कवी आहेत ते, अनेक ग्रंथ करण्यांत पुरुषार्थ मानितात तो त्यांणीं मानू नये. अंभर वाउगे ग्रंथ करून लोकांस वाचायाचा श्रम द्यावा, त्यापेक्षां एकच पण सर्व मान्य असा केल्यांत पुरुषार्थ विशेष आहे.

---

गोष्ट ११५.

तरणा आणि ग्रीष्म पक्षी

कोणी एक तरणा उडाव होता, त्याचा बाप त्यास पुष्कळ द्रव्य ठेवून मृत्यु पावला. तें द्रव्य हातीं घेतांच त्याणें तें अंमल करण्यांत, जुवाखेळण्यांत, वेश्येचे संगतींत, आणि आपल्ये सारिखे निर्द्धोगी विसनी यांचे सोबतींत, सर्व उधळून टाकिलें, आणि दळिद्री झाला. एकेसमयीं तो

दीनवाण्या सारिखा नदीतीरीं फिरत होता; त्या दिवसीं महिना पुसाचा, परंतु सूर्य चांगला तपून कांहीं उन्हाळ्याची छाया मारित होती; तेथें चुकोन आलेला असा एक ग्रीष्म पक्षीही त्याणें पाण्यावर तरतां पाहिला. तेव्हां त्यास व्यसनाच्या धुंदीमध्यें असें वाटलें कीं, उन्हाळा खराच आला; आतां आपल्यास पांघरुणाचें काम नाहीं. असें विचारून, त्याणें आंगावरचीं पांघरुणें गाहाण ठेविलीं; आणि त्यांवर पैसे काढून, सोबत्यां बरोबर, मातक्यानें एक जुव्याचा डाव मारायास गेला, तो हारला. मग त्यास वस्त्रांवांचून थंडीची पीडा फार झाहाली. तें त्यास आश्चर्य वाटून तो पुनः नदीतीरीं जाऊन पाहातो तंव, पाणी गोठलें आहे; आणि तो ग्रीष्मपक्षी थंडीनें मेला, तो थडीस लागला आहे. तें सर्व पाहून मग तो मुडीवर आला; आणि त्या पक्ष्यास शब्द ठेवून ह्मणतो, अरे पक्ष्या, मी मूर्ख, कीं तुजवर विश्वास ठेविला; रे, त्वां मलाही ठकविलें आणि आपल्यासही ठकविलें.

तात्पर्य

जे कैफ करितात, जुव्याचे आखाड्यांत जाता त, अथवा विसन्याचे सोबतींत फिरतात, अथवा छिनळांची संगत करितात, त्याणीं, आपला पैसा लवकर कसाहो सरला? आणि आपण इतके ल वकर दरिद्री कसेहो झालों? ह्मणून आश्चर्य करूं नये. असल्ये व्यसनांचे पाठीस जे लागले, त्यांस, त्यां व्यसनांच्या तारेनें कांहीं डोळ्यां पुढें दिसेना सें होतें. ज्यांचा रात्र आणि दिवस छंदच हा कीं, आहे तें उधळावें; तें सरल्यावर आणिखी उ धळायास पाहिजे ह्मणून मिळवावें; शेवटीं कर्ज काढून तरी उधळावें; अशा पुरुषांस, दरिद्र हें पारिपत्य फार थोडें आहे. ते इतर लोक करि तात तसा विचार करीत नाहींत: व्यसनाचे स्वा धीन झाल्यामुळें, त्यांस सर्व गोष्टी उलट्या दिस तात; जशी डोळ्यांस कावीळ झाली ह्मणजे जें पाहावें तें पिवळट दिसतें. वरील गोष्टींतल्ये

तरण्याने

तरण्यानें जर थमळ विचार केला असता तर, त्या स उन्हाळा आला असें वाटून, राहिलीं होतीं तींही चिरगुटें त्याचीं जातींना. परंतु व्यसनामुळें त्याणें उन्हाळा नसतां उन्हाळा पाहिला, आणि पुढें कधिंही हिंवाळा येणार नाहीं असें समजोन चिरगुटें विकिलीं; तींही कशास? खेळून पैसे उधळायास. मग पयसेही गेले, आणि चिरगुटेंही गेलीं, तेव्हां त्याचे डोळे उघडले; नंतर विचार होऊन फळ काय?

---

गोष्ट ११६

सांबर आणि पाडस

कोणी एक सांबर आपल्या तारुण्यांत आलें असतां, तें इतर सांबरांस मोठा उपद्रव करूं लागलें. त्याणें भुईंवर पाय मारावे; शिंगें हालवावीं; आणि उंच स्वरानें ओरडावें; असें कीं सर्वांनी भय पावून कांपूं लागावें. एके दिवशीं त्याचें

पाडस

पाऊस घेऊन त्यास विचारितें, अहो, जे तुह्मी आपण मोठे बळकट, मोठे दुर्जय, असा आव घालितां, ते तुह्मी कुतऱ्यांचा शब्द ऐकतांच भयानें जीव घेऊन कांहो पळतां? याचें कारण काय तें मला सांगाल? सांबर ह्मणतो, बाळका, तूं बोलिलास तें खरें; परंतु तें कसें होतें तें मला हि समजत नाहीं. मी आपल्ये मंडळीमध्यें ते जस्ती, बळकट आहें खरा; आणि मी वारंवार आपल्येकडून आपल्येठायीं निश्चय करितों कीं, कोणाही पासून भय पावून अतःपर मी डगमगणार नाहीं; परंतु काय करूं? कुत्र्याचा शब्द माझे कानीं पडला पुरे, ह्मणजे माझी गाळण होत्ये. मग होईल तितकी त्वरा करून मी पळतच सुटतों.

तात्पर्य

फांकडे, भांडखोर पुरुष, अनतान घातकी असतात. त्यांचा आपल्ये सोबतींच्यांत मात्र तितका थाव पाहावा, शूरां पुढें त्यांच्यानें टिकाव

धरवत

धरवत नाहीं. पाह्याण्यांत असें आलें आहे कीं, ज्याचे सुखांत रात्र आणि दिवस शिपायगिरीच्याच गोष्टी, अशा पुरुषाकडे, एकाधे वीरानें डोळे वटारून पाहिलें पुरे, ह्मणजे त्याचा हिरमोड झाला. मग असले खोटे अवसान घालणाराचाघाण उतारा पाह्याण्यांत चमत्कार आहे. अशे वेळेस तो मग भय लाज आणि रोष या तिहींचे गोंधळांत पडतो. तो जर धैर्य धरून थोडेंसें शौर्य करील तर, आपली शोभा राखों शकेल; परंतु त्याचा उपाय नाहीं; प्रसंग आला ह्मणजे त्याचें अवसानच जातें. यासाठीं खोटा अवडंबर कोणी कितीही घालो, ज्याचा जो सहज स्वभाव तो शेवटीं प्रगट होईलच.

---

गोष्ट ११७

## गाढव आणि सिंह यांची पारध

कोण्हे एके समयीं सिंहाची मनसा झाली कीं गाढवास संगती घेऊन पारधीस जावें. त्याणें गाढवास

सांगीतलें

सांगीतलें कीं, तूं एका झाडींत दडून ऐस; आणि अमुक वेळेस अवचित मोठ्यानें भयंकर शब्द करूं लाग, तो खोळंबवूं नको; ह्मणजे भयानें घाबरीं होऊन सावजें पळूं लागतील: मी बारी धरून राहातों: त्यावाटेनें जें येईल तें हाणीत जाईन. मग त्या गाढवानें तसें केलें असतां, सावजें पळूं लागलीं. सिंह बारी वर होताच, तो एकेकास मारीत गेला. तीं त्याचे पोटभरी पुरतीं झालीं तेव्हा, तो गाढवास हाक मारून ह्मणतो, गाढवा, भलें केलेंस गड्या भलें केलेंस; आतां पुरे कर, आणि इकडेये. तें ऐकोन गाढव सिंहापाशीं आला; आणि आपण काम चांगलें बजाविलें असें मनांत आणून, लाडानें, त्यास पुसतो, सिंहा, मीकेलें तें तुला मानवलेंना? सिंह ह्मणाला, मानवलें ह्मणून काय सांगूं? रे अतिशय मानवलें: रे गाढवा, तूं असें केलेंस किं, जर तुझें स्वरूप मला ठाऊक नसतें, तर मीही तो शब्द ऐकून पळूं लागतों.

तात्पर्य

तात्पर्य

किती एक या गाढवा सारिख्या मोटमोटा ल्या गर्जना वल्गना करून अजाणत्ये लोकांस भ य उत्पन्न करितात; त्यांचें स्वरूप ओळखतात, त्यांस तें कौतुक मात्र होतें. तर असले पुरुष जेथें आढळतील तेथें त्यांचा अमळ बारीकपणें शो ध मात्र करावा, ह्मणजे दिसोन येईल, कीं त्यां पासून भय पावायास प्रयोजन नाहीं.

——॰○॰——

गोष्ट ११८

शाहाणा गाढव

एक ह्मातारा, आपला गाढव चारीत होता, तो, शत्रू येऊन पाठीवर टेंकला ह्मणून, गाढवा स पळायाची त्वरा करूं लागला. ते समयीं गा ढव त्यास विचारितो, धन्या, माझे पाठीवर तुझा तो शत्रू कंडाळ घालील कीं नाहीं बरें? ह्मा

तारा

तारा ह्मणाला घालील, यांत संशय काय? गाढ व ह्मणतो अशी गोष्ट आहे तर, मी येथू न एक तसूभर देखील हालणार नाहीं. माझे कपाळची कंठाळ जर सुटत नाहीं, तर माझा ध नी कोणी कां होईना; त्याचा मला काय हर्ष शो क?

तात्पर्य

गरीब लोकांनीं राज्याचे उलटा पालटींत चि त्त घालूं नये, घातलें असतां ते पेंचांत मात्र पड तात. येऱ्हवीं त्यांस उलटा पालट काय तो इ तकीच कीं, एका नावाचा राजा होता, तो दुसरे ना वाचा झाला. तेणेंकरून ते कांहीं अधीक गरीब होतात, किंवा मागें करीत होते त्यापेक्षां त्यां स अधीक काम करावें लागतें असें नाहीं. अ सें असतां पाहाकीं, चार स्वार्थ साधक लोक अस तात, ते त्यांस अभिमानास घालून युक्तीनें दंग्यांत

थोडितात; सन इंगा सिद्धीस गेला असतां त्यां स लाभतर होत नाहींच, परंतु फसला असतां सुळीं जायाचें पडतें.

—∞※∞—

गोष्ट ११९

बढाईखोर प्रवासी

कोणी एक पुरुष, फार दिवस प्रवास करून घ रीं आला, त्याणें आपण देशांतरीं काय काय कौतुक पाहिलें तें आपले बळखीच्यांस बनावून सांगीतलें; त्यामध्यें त्याणें हीहि गप झोंकिली, कीं, मी थलका पुरीस गेलों होतों; तेथील लोक पंधरा पंधरा हात उड्या मारितात. परंतु जेव्हां त्यां शींनशीं पण पडला तेव्हां, माझे उडीस कोणी च लागला नाहीं. जवळ होते त्यांस ती गोष्ट खरी वाटली नाहीं, तें पाहून तो, त्यांस प्रमा ण वाटावें ह्मणून आणा शपथा करूं लागला.

तेवेळीं त्यांतून एक त्यास ह्मणतो, बाबा, तूं इ तक्या संकटांत कां पडला आहेस? हातचे कां कणास आरसा कशास? आह्मास तें आतां प्रत्यक्षच कां दाखवीस ना? तूं असें समज कीं, मी आसमयीं अलकावतींतच आहें; आणि तूं तेथें उडलास तसा पुनः एकदां येथें उडून दाखीव कसा? बढाई खोरास तें रुचलें नाहीं, मग तो ओशाळा होऊन उगाच राहिला.

तात्पर्य

जे कोणी परदेश फिरले आहेत किंवा नाहीं फिरले, त्यां सर्वांनींहि, आपल्ये बढाईचा संबंध ज्यांत आहे ती गोष्ट, आपल्ये तोंडीं सांगूं नये. आपल्ये तोंडानें आपली स्तुतीची गोष्ट लोक खरी मानीत नाहींत, मग आपण शपथा प्रमाण करायास लागतों, तंव तंव त्यांस अधीक संदेह उत्पन्न होतो. वास्तवीक गोष्टीची ही अवस्था, मग जी आपण स्कीती साटींच बनावून सांगतों,

तीची

तीची काय कथा? चौघांमध्यें बाहेरच्या खोट्या कथा सांगतात, त्यांची लबाडी धरिलीजात्ये. त्या मंडळींत समर्थी कोणी एकादा त्या देशीं गेले ला असतो, तो लागलेंच, पदरीं माप घालाया स चुकत नाहीं.



गोष्ट १२०

गरुडपक्षिण, माजर, आणि डुकरी

एका गरुडपक्षिणीनें, एके मोटे झाडाचे खां दीवर घरकुंडा केला होता. एक जंगली मा जर त्या झाडाचे मध्य भागास ढोलींत राहात हो ती. आणि एक रानडुकरीही, आपल्ये पिल्यां सहवर्तमान, त्या झाडाचे बुडीं पोकळींत वस्ती करून होती. तो शेजार त्यांस सुख कारक होऊ न फार दिवस घालला असता, जर त्यांहीं त्या दुष्ट माजरीची चाहाडी ऐकली नसती. एके

दिवसीं

दिवसीं माजरीनें असें केलें, कीं प्रथम गरुड पक्षिणीपाशीं वर गेली, आणि तीस सांगूं लागली; शेजारणी बाई, काय सांगूं? आपणास मोठी अनर्थाची वेळ आली आहे; ती द्वाड डुकरी, रात्र आणि दिवस झाडाचे बुडाशीं उकरीत असत्ये; मनांत कीं, झाड उपडून पडलें ह्मणजे आपलीं पिलीं तीचे हातीं सहजच लागतील. मीतर बाई आतां मला बरा मार्ग दिसेल तो करित्यें. तुह्में तूं आपलें पाहा. याप्रमाणें गरुड पक्षिणीचे मनांत भय उत्पन्न करून, तिला नकळतां हळूच ती मांजर खालीं डुकरी जवळ आली; आणि खिन्न वदन करून बोलत्ये, बाई, आज तुह्मी बाहेर तर जात नाहीं? डुकरी ह्मणाली, असें कां पुसत्येस? माजर ह्मणत्ये नाहीं, सहज विचारिलें. तुमचे मर्जीस येईल तसें करा, परंतु गरुड पक्षीण आज आपल्ये पिल्यांस ह्मणत होती कीं, डुकरी बाहेर गेली ह्मणजे मी तुह्मास तिचीं पिलीं खाऊं घालीन, आणि एक माजराचेंही पील खावीन. असें बोलली तें, माझे कानीं पडलें. तर

आतां

आतां मी येतें; माझीं मुलें एकटीं आहेत; त्यांस मला सांभाळीत बसलें पाहिजे. असें ह्मणून तो वर चढून आपल्ये पिल्यां जवळ गेली; आणि त्यांस राखित बसली. याप्रमाणें तिणें किती एक दिवस पर्यंत केलें. खायास पाहिजे तें तिणें रात्रीस चोरून बाहेर जावें, आणि आणावें; दिवसास पिलें राखीत बसोन त्यांवर साशंकीत पाहात असावें. याप्रमाणें तिचें चरित्र पाहून, गरुड पक्षिण आणि डुकरी, यांचे मनांत परस्परांवर पक्का द्वेष बाणला. मग त्या एकी मेकीचे भयानें जागा सोडून कोठें गेल्या नाहीं. शेवटीं त्यांचा असा परिणाम झाला कीं, त्या, व त्यांचीं बाळकें, अन्नावांचून मृत्यु पावलीं; आणि त्या माजरीची धण झाली.

## तात्पर्य

चाहाडांनी, या जगांत घोरघोर अनर्थ केले आहेत. कितीकां भल्ये कुटुंबांमध्यें द्वेष पाडिले आहेत, ते शेवट पर्यंत मिटलेच नाहींत. किती

कांचे

कांचे मनांत विकल्प घातले आहेत, ते निघाले च नाहींत. कितीकांस धुळीस मिळवीले आहे त, ते पुनः वर आलेच नाहींत. जो पुरुष शेजा र धर्मांत वागायास इछितो, त्याणें नुसत्ये कोणाचे सांगीतल्या वरून आपल्ये शेजाऱ्याविशीं मनांत वां कडें आणूं नये; ऐकिंव गोष्टीवर कल्पना करून आपलें मत दुसऱ्यापाशीं बोलूंनये; कांकीं ज्यापा शीं बोलतों त्यास जर चाहाडी कर्तव्य आहेतर, तो मुंगीचा हत्ती करील; राईस पर्वता एवढी क रून दाखवील. जो पुरुष भला आहे त्या जवळ कोणी कोणाचें कसेंही सांगो, तो सर्व पोटांत सां ठवून ठेवितो; एकाचें दुसऱ्यापाशीं सांगत नाहीं; त्याचें फळ, मग ते दोघेही त्याजवर सारिखी प्री त करितात; ते शत्रू असले तर समर्थीं त्याचे द्वा रें मित्र होतात; तेणें करून त्या पुरुषाचें मन किती समाधान पावत असेल बरें?

गोष्ट १२९.

## बहीण आणि भाऊ

एके पुरुषास दोन लाहान मुलें होतीं; एक मुलगी आणि एक मुलगा. मुलगा होता तो फार सुंदर होता. मुलगी साधारण होती. एके दिवशीं तीं उभयतां मुलें, आरशापाशीं खेळत असतां, मुलगा मुलीस ह्मणतो, अगे, या आरशांत पाहा सुंदर कोण दिसतें तें. मुलीस तें वाईट वाटलें. तिला समजलें कीं, यानें हें मला हिणवायासाठीं ह्मटलें. मग तिणें बापाजवळ जाऊन भावाचें गाऱ्हाणें केलें; आणि ह्मणाली बाबा, आरशांत रूप पाहून समाधान पावणें हा बायकांचा विषय होय; त्यांत चित्त घालणें हें पुरुषास योग्य नाहीं. बापानें दोघांसही आलिंगून त्यांचें समाधान केलें. आणि ह्मणाला मुलांनो, तुह्मी भांडूं नका. अतःपर तुह्मी दोघेंही नित्य आरशांत पाहात जा; मुला, तूं या

करितां

करितां पाहा, कीं तुझ्या ह्या असे सुंदर तोंडा स दुर्गुणांचा मळ लागला तर तुला समजेल; आणि मुली, तूं या करितां पाहा कि, तुझे रूपां त जें उणें आहे तें, तुझे गुणांनीं पुरतें जाहालें कीं नाहीं, तें तुला समजेल.

## तात्पर्य

अशी कांहीं या सृष्टींत वस्तु नाहीं कीं, विचाराचे अंती जींत कांहीं उणे दिसतनाहीं. यासाठीं बुद्धि रूप आरसा करून. त्यांत आपले गुण अवगुण नित्य पाहात गेलें असतां मोटें हित आहे. हें आबाळ वृद्धांनीं ही करायास योग्य आहे. जो स्त्रीनी वा पुरुष आहे, त्यास आपले अवयव आरशांत सुंदर दिसोत; परंतु त्याणें विचार करून पाहावें कीं. जसा मी बाहेरून नीट बनलों आहें तसा आंत आहें कीं नाहीं? मदना सारिखा सुंदर आहे, आणि आंतले गुण जर वाईट आहेत तर, तो पुरुष लोकांस अप्रिय होतो; तोच

जर मधुर भाषण, उत्तम स्वभाव, आदिकरून गुणांनी युक्त आहे तर, लोकांस फारच आवडतो. सुरूपास चांगले गुण नसले तर, तो उपयोगी नाहीं; परंतु जो चांगले गुणाचा, त्याचें रूप कसें ही असो, तिकडे लोक लक्ष्य देतनाहींत. खोटे पाषाणास चमक फार असत्ये, परंतु तो काय खरें रत्नाची बरोबरी करील? तें बाहेरून बेडौल आहे तरी हाडीं रत्नचकीं? तसा जो आंत चांगला; ज्याची बुद्धी स्वछ; करणें चोख; मन सरळ; जो शाहाणा; त्यास रूपाचें प्रयोजन नाहीं.

---

गोष्ट १२२

कोल्हा आणि माकड

कोणाएका काळीं, सर्वपशूंनीं माकडास राजा केला. त्यास राज्याभिषेक होतांच, त्याणें आपले ठायीं मोटे चोकसपणाचा आणि शाहाणेपणाचा आव घातला. तो पशूंचा वेडेपणा पाहून

कोल्ह्यास

कोल्ह्यास वाईट वाटलें. त्याणें मनांत निश्चय केला कीं, एकादे वेळेस तरी मी, या माकडास तोंडघशीं पाडून सर्वपशूंस खालीं पाहायास लावीन. कांहीं दिवस गेले तों, एके खांचेंत कोण्पी मास लावून सांपळा मांडला होता. तो पाहून कोल्ह्यानें माकडास सांगीतलें कीं, मी एके ठिकाणीं ठेवा पाहिला आहे; त्याचा धनी कोणी दिसत नाहीं या साठीं तो स्वामीचा असें मला वाटतें. माकडास कपट ठाऊक नाहीं; तें लवकर तो घ्यावयास गेलें; तों, मासास हात घालतांच सांपळ्यांत सांपडलें. तेव्हां त्यास फार लाज झाली, आणि तें कोल्ह्यावर चडफडूं लागलें; ह्मणालें कीं, तूं घातकी, राजद्रोहपातकी आहेस. कांहीं चिंता नाहीं, मी तुला मोटी शिक्षा करीन. तें ऐकून कोल्हा खदखदां हांसला; आणि जाते समयीं मागें पाहून मान हालवून माकडास ह्मणाला; कांगे, राजा ह्मणवितोस आणि तुला सांपळा कसा समजला नाहीं.

तात्पर्य

## तात्पर्य

अल्प समजाचे पुरुषानें राज्यकारभार डोई वर घेऊंनये; घेतला असतां तो आपला व लो कांचा स्वार्थ बुडवितो. असले थोर पदवीस यो ग्य तोच पुरुष, ज्याची दक्षता विशेष; जो प्रसा णीक; जो सत्य वचनी; जो दुसऱ्यास ठकविणारा नव्हे, आणि दुसऱ्यापासून ठकला जाणारा नव्हे; ज्या लोकांवर राज्य करितो त्यांच्या रीती भी ती जाणता; उद्योगी; शूर, पण जो क्रोधी नव्हे; भ ला, पण जो मृदु नव्हे; स्तुतीची इच्छा करितो, प ण वास्तवीक गुणाचे स्तुतीची; स्फीतीचा ज्यास ति रस्कार; करावें, नकरावें, याचा ज्याचे बुद्धीस सं देह पडत नाहीं; ज्यांत दांभीकपणा नाहीं. अ से असे गुण ज्यांगीं नसोन जे राजे झाले, त्यांच्या दशा कशा झाल्या आहेत, तें मागील इतिहास पाहातां स्पष्ट आहे. त्यांपासून लोकांस उप द्रव झाले; जे धूर्त होते त्यांणी त्यांचा स्वभाव

ओळखून

ओळखून त्यांस वश केलें; आणि लोक हिताचे उ द्योगावरून काढून त्यांचे चित्त विषयभोगाकडे ठेविलें, आणि आपला स्वार्थ साधून घेतला.

---

## गोष्ट १२३

### खेंचर

एके खेंचरास पुष्कळ चरवें मिळून थोडें का म पडत असे, तें कांहीं दिवसांनी चांगलें पुष्ट झालें, आणि स्वछंद उड्या मारूं लागलें. त्यास कोणी सांगीतलें कीं तूं घोड्याचा बच्चा आहेस, तोही घोडा कसा ह्मणशील? तर सामान्य न व्हे, पैजा जिंकणारा. तें मनांत धरून खेंचरानें आपल्ये ठायीं निश्चय केला कीं, प्रसंग पडला अ सतां मी मोटी मजल करीन. थोडके दिवस गे ले तों, एके दिवशीं त्याचा धनी त्याजवर बसून कोठें नाजूक कामास जात होता. त्याणें त्यास

अधीक धांवावें ह्मणून पुष्काळ कमच्या मारि ल्या; तेससयीं तें खेचर मार्ग क्रमितां क्रमितां पा र थकलें; आणि आपल्ये ठायीं आपल्यास ह्मणूं ला गलें, रे आतां तुझें तें घोड्याचें वीर्य कोठें आहे? तर याजवरून मला असें दिसतें कीं तुझा बा प घोडा नव्हे, गाढव होता.

तात्पर्य

जे वडिलां वरून आपणास थोरवी मानिता त, ते गाढव समजावे. जो खरा थोर मनुष्य आ हे तो, आपल्ये कीर्तीनें आपण थोर असतो. ख चें जो अपराक्रमी तोच वडिलांचे नावावर आ पणास थोरपणा आणायास जातो; तें त्याश न साधतां त्याजकडे अधीक हलकेपणामात्र ये तो.

## गोष्ट १२४

### साग्याचा रुख आणि कांटेझाड

एक उंच सरळ साग्याचा रुख अरण्याचे मध्य भागीं वाढला होता. तो नित्य आपले थोरीचे गर्वानें आपले खालीं रुजलेले झाडांस धिक्कारीत असे. त्या झाडामध्यें एक कांटेझाड होतें, त्यास तें नसाहून, त्याणें त्या साग्यास एके दिवशीं विचारिलें, बाबा, तूं एवढा गर्व कां वाहातोस, ते सांग? तो ह्मणाला, मी सर्व वृक्षा मध्यें श्रेष्ठ आणि शोभिवंत आहें; माझा माथा मेघ मंडळा स भेदून गेला आहे; माझ्या खांद्या संतत हिरव्या टवटवीत राहातात. आणि तुह्मी कशीं आहा, कीं बहुत नीच; जो आला त्याणें तुह्मा स पायांखालीं तुडवून जावें. माझे पानावरून जो टिपक्यांचा प्रवाह पडतो त्याणेंच तुह्मी बुडतां. कांटेझाड ह्मणालें, तें सर्व असो; पण मी तुला सांगतों तें खरें मान, कीं जेव्हां लांकुड

तोड्या

तोझा तुझे बुडावर कुराडीचा घाव घालायास ये ईल, त्यासमयीं, आह्मा मधील, जें एकादें केवळ निकृष्ट हलकें झाड, त्याशीं पण तूं मोठ्या संतो षानें आपल्ये मोठाईची अदलाबदली करायास इछिशील.

## तात्पर्य

थोरा मागें अनेक उपाधी आहेत तितक्या ला हानास नाहींत. याकरितां थोर आणि लाहा न यांच्ये सुख दुःखांचा विचार केला असतां, थो रपणाच चांगला असें ह्मणायास अवघड पडेल. अशी गोष्ट असतां पदवीनें किंवा संपतीनें जे थो र झाले, त्याणीं गर्व करून लाहानाचा तिरस्कार करावा, हा किती मूर्ख पणा?

---

## गोष्ट १२५

## इंद्र आणि गणेश

कोणे एके समयीं देवांस असें वाटलें कीं, मृ त्यु लोकांतील झाडांमधून एक एक झाड आप

आपले

आपले खर्चेंतलें करून ठेवावें. तेव्हां इंद्र ह्म णाला सांबरीचा रख माझा. कामदेवानें गुलबा सीस अंकित केलें, चंद्रानें तगरीस. वायूनें क णेरीस. आणि वरुणानें पांगेर्‍यास. याप्रमाणें त्यांस तीं निफळी झाडें आवडलीं पाहून, मगप तीनें आश्चर्य केलें. आणि ह्मणाला, तुमचे इच्छे स येईल तें तुह्मी करावें; परंतु नारिकेल हें मा झें झाड असो, ज्याचीं फळें उभयतां देव मनुष्यां स प्रियकर; आणि जें सर्वांगीं उपयोगी आहे. तें ऐकून इंद्रानें मान डोलवून ह्मटलें, गणेशा, या साठींचरे, लोक तुला ज्ञानाची देवता ह्मण तात. आणि खरेंच आहे किं, उपयोगा वांचून, जो उगीच स्फीती साठीं एकाद्याचा अभिमान धरणें, तो वेडेपणा.

## तात्पर्य

जें कांहीं करणें तें केवळ स्फीती साठींच क रूं नये. ज्यांस आश्रित करून ठेवणें त्यांपासून कां हि उपयोग पाहावा, केवळ शोभा पाहूं नये.

गोष्ट १२६

## घुबड आणि टोळ

एक म्हातारा घुबड झाडाचे ढोलींत नीज घें त होता; त्या झाडा खालीं एक टोळाने गायन आ रंभिलें. ते समयीं घुबडानें दोन तीन वेळ टो ळाची प्रार्थना केली कीं, बाबा, तूं येथून आ मला उपद्रव देऊं नको. तुझ्या किर किरीनें मा झी झोंप मोडत्ये. त्यावरून तो टोळ त्यास धि कारून शेवटीं गाळी देऊं लागला. म्हणाला कीं तूं लुच्चा चोर आहेस, रात्रीचा बाहेर जाऊन तस्करीवर पोट भरितोस; आणि दिवसास झाडा चे ढोलींत लपून राहातोस. घुबडानें त्यास सां गीतलें, म्हस्या, तूं आपलें तोंड संभाळ, नाहीं तर मग पस्तावशील; तरी तो टोळ ऐकेना, अधी क अधीकच निंदा करून त्याणें मातब्यानें गायनास आरंभ केला, तेव्हां घुबडानें त्याची कपट स्तुती आ रंभिली; म्हणाला बाबा, क्षमा कर, मजपासून आगळीक झाली. परंतु आतां माझे अनुभवास

पडें

पक्षी आलें कीं, जागावें तर तुझें सुस्वर गाणें ऐकतच जागावें; तुझे मधुर स्वरापुढें सारंगी कांहींच नाहीं. तुझें गाणें ऐकून कोकिळहि लाजेल. बरीच आठव ण झाली. मज जवळ एक अमृताचा कुपा माझे देव तेने दिलेला आहे; त्यांतील एक कटोरा भरून पाहिजेतर मी तुला देईन. तुझा गळा गायन क रितां सोकला असेल असें मला वाटतें. टोळ ता हानेला होताच, तो त्या घुबडा जवळचें अमृत घ्या वें ह्मणून मोटे आशेनें त्या पाशीं गेला. तो जवळ येतांच घुबडानें उचलून तोंडांत टाकिला.

तात्पर्य

प्रत्ती प्रकती भिन्न आहेत. एकाद्याचे प्रक तीस दुसऱ्याचें केलेलें रुचत नाहीं. यासाठीं त्याणें एक दोन वेळा प्रार्थून सांगीतलें असतां ही त्यास उपद्रव देणें हें प्रशस्त नव्हे. आणि उप द्रव देऊन उलटें भांडण करणें हातर केवळ दुर्वृत्त पणा. मग जे असें करितात, त्यांस उपद्रविता या हून पारिपत्य झालें तर आश्चर्य नाहीं.

गोष्ट १२७

## एकडोळें हरिण

एक एकडोळें हरिण नित्य समुद्रतीरीं चरत असे; मनांत कीं चरत असतां फुटका डोळा समुद्राकडे आणि धडसा देशाकडे असला ह्मणजे धाला येईल तो समजेल. असा बंदोबस्त करून तें आपलेठाईं आपल्यास निर्भय मेजीत होतें. त्यावर एक पारधी फार दिवस टपला होता; त्याचे हातीं तें सांपडलें नाहीं; तेव्हां तो एके नौकेमध्यें बसून हळूच पाण्या कडील आंगून त्या जवळ आला; आणि गोळी लागू करून त्यास पाडाव केलें. मग तें प्राण जाते वेळेस हे शब्द बोलिलें; हे प्रारब्धा! तुझी गती अगम्य आहे; जिकडून मी काळजी वाहात होतों, तिकडून मला उपद्रव झाला नाहीं; आणि जिकडून भय नाहीं असें मला वाटत होतें तिकडून माझा शेवट झाला!

## तात्पर्य

या जीविता मागें नाना प्रकारचीं भयें लाग लीं आहेत. त्यास आपण पाहिजे तितके जप लों तरी, अगदीं निर्भय असें कधीं होणार नाहीं. या प्रपंचांत यावयाची वाट तर एकच आहे; परंतु, येथून जाण्याच्या वाटा असंख्य आहेत; ते थें आपली चौकशी किती चालते? ज्या घाती आपल्ये लक्षांत येतात, अथवा ज्या प्रत्यक्ष दिस तात, त्यां पासून बचिवाटतां येईल; परंतु ज्या आपल्ये डोळ्यां आड, ज्या लक्षांत येत नाहींत अशा, आपल्या आसपास शतशः आहेत, त्यां पासून कसें निभावें? यांत इतकें सुचविलें कीं, आपण निर्भय आहों असें कधींही मानूंनये; अथ वा सभय आहों ह्मणून निर्भय होण्याचे मागें फा र लागू नये. ज्या अर्थीं निर्भय होणें आपल्ये हातीं नाहीं; त्या अर्थीं रात्र दिवस भयाची का ळजी वाहाणें हें मूर्खत्व, मनुष्या सारिखे विवेकी प्राण्यास योग्य नव्हे.

गोष्ट

गोष्ट १२८

## वरुण आणि कावाडी

एक कावाडी एकानदीचे कांठचा वृख तोडी त होता; त्याची कुऱ्हाड अकस्मात् त्याचे हातून सुटोन पाण्यांत पडली; ह्मणून तो बहूत शोक करूं लागला. त्याचा विलाप ऐकून वरुण देव तेथें प्रघट झाला; त्यास कावाड्यानें आपले शो काचें कारण सांगीतलें. ते समयीं वरुण पाण्यां त बुडी मारून एक सोन्याची कुऱ्हाड वर घेऊ न आला, आणि ती त्या कावाड्यास दाखवून वि चारितो, अरे हीच तुझी कुऱ्हाड? तो ह्मणाला ही माझी नव्हे. नंतर वरुण पुनः बुडी मारून एक रुप्याची घेऊन आला. तीस पाहून हीही मा झी नव्हे ह्मणून कावाडी ह्मणाला. तिसरे खेपे स तो कावाड्याची हारविली होती ती कुऱ्हाड घेऊन आला; तेव्हां ती कावाड्यानें मोठा हर्ष पावून घेतली; आणि वरुणाचा फार उपकारी झाला.

झाला. ते समयीं काबाड्याचा प्रमाणीक व्यवहार पाहून वरुणानें संतुष्ट होऊन त्या सोन्या रुप्याच्या दोन्ही कुऱ्हाडी त्यास बक्षीस दिल्या. तें वर्तमान काबाड्याचे सवंगड्यास समजलें, त्यांणेंहि नदीवर जाऊन तशीच हातांतील कुऱ्हाड पाण्यांत पाडिली, मग कोणी ह्मणेल खरेंच, तसा विलाप करीत बसला. तें ऐकोन पहिल्याप्रमाणें वरुण तेथें आला, त्याणें बुडी मारून सोन्याची कुऱ्हाड वर काढिली, आणि त्या काबाड्यास ह्मणाला, तुझी कुऱ्हाड गेली आहे ती हो चरे? तें सोनें पाहून काबाड्याचें चित्त चंचळ झालें. तो वरुणास ह्मणाला, होयरे बाबा, हीच माझी. असें ह्मणून तो तो हावरेपणानें वरुणाचे हातून घ्यावयास गेला; तेव्हां वरुणानें त्याची निर्भर्त्सना करून त्यास सोन्याची तर दिली नाहींच, परंतु त्याची मुळची होती तीही त्याचे हातीं लागूं दिली नाहीं.

तात्पर्य

तात्पर्य

बहुत करून लोकांचा, अन्याय मार्गीं चालण्या कडे कल पडत असतो. या विश्वांत ठकपणाचें वर्तावें या विषयीं किती एक आहेत ते अनेक हेतू सांगतात, ते सांगोत; परंतु पाहातांशीं प्रमा णीकपणा सारिखा गुण नाहीं. पाहाकिं, इह लो कीं आपण सचवटीचा गृहस्थ असतो त्याजवरच सर्व कामें विश्वासतों, आणि त्यास थोर ह्मणून मानितों; तसेंच परलोकप्राप्ती विषयीं पाहिलें अ सतां, कोणत्याही लोकांचे शास्त्रांत सचवटीची प्र शंसा नाहीं असें नाहीं. ह्मणून सचवटीचा मनु ष्य दोहों लोकींही पूज्य होतो.

———०:❀:०———

गोष्ट १२९

लांडगा कोल्हा आणि वानर

एका वानरास पंच करून त्यापुढें, लांडग्यानें, कोल्ह्यावर चोरीची फिर्याद आणिली. ह्या पंचा

झतीचें कौतुक पाहावयास इतर पशूही सभेस आले होते. तेथें सांडग्याचें बोलणें संपल्यावर कोल्ह्यानें एकागोष्टींत उत्तर दिलें कीं, मीं सां डग्याची वस्तु चोरिली नाहीं. मंतर त्या वा दाचा विचार करून वानरानें सारांश सांगीतला. सांडग्यास ह्मणाला, अरे, तुझीअशी वस्तु कांहीं गेली नाहीं. आणि कोल्ह्यास ह्मणाला, तूं ठेव खालीस खरी, यांत कांहीं मला संशय नाहीं. या प्रमाणें ते दोघेही लुचे असें ठरावून सभा उठली.

तात्पर्य

लुचा ह्मणून जो एकवेळ प्रसिद्धीस आला त्यास खरें कोणीच मानीत नाहीं. सांडगा हा दुसऱ्याचें चित्त हरण करणारा, आणि कोल्हा हा पक्का ठक, असें प्रसिद्ध आहे ह्मणोन, तसा न्या य झाला.

## गोष्ट १३०

### नदी मछ आणि समुद्र मछ

एका नदींतील मासा, पूराचे ओघानें समुद्रांत वाहात गेला. तो नवे देशांत येतांच, तेथील वस्तीकरांस ह्मणवत मानूं लागला. ह्मणाला, माझा देश, व जात, व कुळ, तुह्मांपेक्षां चांगलीं आहेत, यासाठीं तुह्मी सर्वांनी मला उंच ठिकाणीं बसवून मान द्यावा. तेथें जवळच एक हलवा मासा होता, त्याणें तें ऐकून उत्तर केलें, रे, अतःपर अशी गोष्ट बोलूं नको. कदाचित् तूं आणि मीं एका जाळ्यांत सांपडले गेलों तर, तुला समजेल उंच जागा कोणाची ती; व्हावें तें मोल देऊन मला श्रीमंत लोक, भक्षायास नेतील; आणि तूं तर गरीब लोकांस हलके मोलानें विकला जाशील, किंवा फुकटावारिही दिला जाशील.

### तात्पर्य

परस्थळीं जाऊन त्यास्थळाची निंदा, आणि स्वदेशाची स्तुती करितो तो अनाडी पुरुष जाणावा.

ज्याची त्याची स्वदेशावर प्रीत स्वाभावीक आहे. आपण परदेशाचा तिरस्कार करून स्वदेशाचें वर्णन करूं लागलों तर, त्या देशींचे लोक आपणास निषेधून स्वदेशाची प्रशंसा करितील. वस्तुतः आपला देश चांगला आहे ह्मणून आपण थोर होतों असे नाहीं; त्यास तर आंगचा गुण पाहिजे. यासाठीं कोणत्येही देशाचा रहिवाशी असो, जो विद्वान् असोन गुणवान् असेल, तोच सर्वत्र प्रतिष्ठा पावतो.

—०○❋○०—

## गोष्ट १२१

## देवशर्मा पंडीत

एके समयीं देवशर्मा पंडीत खेळत होता, तें पाहून कोणी एका दुसरे पंडिताने त्याची थट्टा केली. त्याचा गर्व उतरावा ह्मणून देवशर्म्याने एक धनुष्य आणविलें; आणि त्याचें सीत काढून,

तें

तें निर्वांक करून भुईंवर ठेविलें. मग तो त्या पंडितास विचारितो, हें माझें कूट सांगशी ल तर तूं विद्वान् खरा. पंडितास तें उकलेना, तें व्हां तो देवशर्म्यास ह्मणाला, याचा अर्थ आतां तूं च सांग, मला समजत नाहीं. देवशर्मा ह्मणा ला, तुला समजत नाहीं तर मीं सांगतों ऐक. जर हें धनुष्य सदां वांकविलेलें असेल तर, लवकर च मोडून जाईल; आणि जर काम पडेल त्यात्या समयीं वांकविलें, तर फार दिवस टिकेल, आ णि अधीक काम करील.

तात्पर्य

मनुष्याचे मन हें धनुष्या सारिखें आहे, या स्ला सदां वेधून ठेविलें असतां, हें शक्ति क्षीणहो ऊन तादृश उपयोगी पडणार नाहीं. ह्मणोन वि नोद आणि खेळ हे, चित्तास विश्रांति कारक तसेंच बुद्धीस तीक्ष्णता आणणारे आहेत. ते निर्दोष आहेत तर प्रसंगीं थोरानी हि सुखें करावे.

गोष्ट

## गोष्ट १३२
## डोमकावळा आणि खबुतरें

एका घुडी मध्यें खबूतरें राहतहोतीं; त्यांचे मंडळींत पिसें पांढरीं करून एक डोमकावळा शिरला; त्याणें मौन धरिलें होतें, ह्मणोन तो खबूतरांचे लक्षांत आला नाहीं. असे किती एक दिवस गेले. एके दिवशीं, कावळ्यास, आपले स्वरूपाचें भान न राहातां तो काकाउं लागला; त्यावरून तो कोणआहे तें समजून खबूतरांनीं त्यास शिक्षा करून हाकलूनदिल्हे. तो पुनः आपले मंडळींत गेला, तेव्हां त्याचीं तीं रंग विरंग पिसें पाहून, हा आपल्यांतला नव्हे, ह्मणून डोम कावळ्यांनींही पिटून लाविला. या प्रमाणें तो कावळा आपले आंगीं नसती योग्यता आणायास गेला तो, होती तीसही मुकून, कावळा ना खबूतर असा झाला.

### तात्पर्य

वेष धारी आहेत त्यांचें इतकें एक बरें आहे कीं, ते फार दिवस लोकांस ठकऊं शकत नाहींत.

नाहींत. त्यांचें बोलणें, किंवा आचरण, एकादे वेळेस तरी त्यांचे सोंगास उणें अधीक पडतें; तेणें करून त्यांचा खोटेपणा लवकरच खऱ्या पुरुषांचे लक्षांत येतो.

---

गोष्ट १३३

चिमणी आणि ससा

एक गरुड पक्षी, सशास धरून त्याचे बोकांडीस बसला होता. तेथें जवळच झाडावर एक चिमणी होती ती त्यास ह्मणत्ये, रे तूं पुरता मूर्ख आहेस. धिक् जिणे तुझें. अरे, तूं उगाच रडून व्यर्थकां आपणास मारवितोस? ऊठ आणि चालता हो. मला असें वाटतें, जर तूं यत्न करशील तर जातीचा चपळ आहेस, शत्रूचे हातांतून सहज निघोन जाशील. याप्रमाणे ती त्यास तिरस्कार करून बोलत्ये आहे, इतक्यांत, एक ससा

प्याने

ण्यानें झेंप घालून तीस उचलिलें; ते समयीं तिणे पुष्कळ विलाप केला, परंतु तें मनास न आणितां ससाणा तीस घेऊन चालला. तें पाहून ससा मरत्ये वेळेस ही समाधान पावून तीस ह्मणतो, अगे, तूं आपणांस निर्धोक मानून मला हिणावित होतीस, त्यास तुजवरही तोच प्रसंग पडला आहे तर, आतां कशी वहिवाटत्येस तें पाऊं?

तात्पर्य

आपणावर बितली असतां घाबरतात, आणि दुसऱ्यास मात्र शास्त्रार्थाच्या गोष्टी सांगतात, हे पुरुष उपहासास पात्र होतात.

---

गोष्ट १३४

बृहस्पती आणि मूर्तिकार

एके समयीं बृहस्पतीस वाटलें कीं, मनुष्यांमध्यें आपल्यास किती मानितात तें पाहावें; ह्मणून तो भूलोकीं आला; आणि मनुष्यरूप घेऊन

एका मूर्ति कराचे दुकानांत गेला. तेथें अनेक देवांच्या मूर्ति विकायास मांडिल्या होत्या, त्यांत त्याणें इंद्रास, कुबेरास, व आपणासही पाहिलें. ते समयीं आपण मूर्ती विकत घ्यावयास आलों आहें असें दाखवून, तो इंद्राकडे बोट करून, मूर्तिकारास विचारितो, अरे, याचें काय घेशील? तो ह्मणाला दोन पैसे. आणि या कुबेराचेंरे? त्याचें कांहीं अधीक पडेल, मूर्तिकार ह्मणाला. तें ऐकून बृहस्पती मान डोलजन त्यास पुसतो, बरें बरें, तर या बृहस्पतीचें मोल सर्वांपेक्षां अधीक असेल नाहींवरे? मूर्तिकार ह्मणाला, जर तूं हे दोनी घेशील, तर तो मी तुला त्यांचे मोलांत फुकटावारीं देईन. तें ऐकोन बृहस्पती ओशाळून माघारा गेला.

तात्पर्य.

जर आपण सन्मार्गानें वर्ततों आहों, उचित तें आचरितों आहों; आपले देशाच, दृष्टांस व

आपणासही

आपणासही कल्याणव्हावें ह्मणोन उद्योग करि तों आहों; तर मग लोक कांहीं कां बोलतना? तें ऐकायाचा उद्योग कशास करावा. जो पुरुष आ पली प्रशंसा लोकांचे तोंडून ऐकायाचा उद्योग करितो, तो बुद्धि मंतांचे लक्षांत आपल्या हलके पणां साच आणितो; मग त्यास बृहस्पती सारि खें तोंडघशीं पडणें होतें.

---

## गोष्ट १३५.

## राजा शूरसेन आणि त्याचा दास

एके समयीं उष्ण काळाचे दिवशीं, शूरसेन रा जा नगरा बाहेर संचार करून परत येतहोता. तो मा र्गांत आपले रम्य वनवाटिकेंत शिरला. तेथें नाना प्रकारचीं झाडें होतीं त्यांचें कौतूक पाहात इकडून तिकडे फिरत आहे, तंव तेथील एक दास, चांगला थाटमाट करून हातांत पा ण्याची झारी घेऊन राजा होता तिकडे वाट

शिंपायास

खिंपायास लागला; मनांत कीं मीं विकीत दास आ हें, राजानें आपली आस्था पूर्वक चाकरी पाहू न प्रसंन्नव्हावें; आणि दासपणा पासून सुटका क रावी. मग तो राजा जिकडे जिकडे फिरे, ति कडे तिकडे त्याचेपुढें तो आडवे तिडव्ये वाटेनें जावून खिंपणें करी. तें त्याचें गरजेपुरतें आ अंव राजाचे लक्षांत येऊन त्याणें त्यास हांक मा रिली; त्यासरसाच तो धांवत येऊन आशा भर लेला पुढें उभा राहिला. तेव्हां राजाने त्यास ह्मटलें, अरे तूंआपलें काम सोडून जो इतका वे ळ परिश्रम केलास, याचें कांहि प्रयोजन नव्ह तें. हा वेळ तुला कांहिं दुसरे चांगले कामाकडे उपयोगीं पडता. तर आतां मी तुझा संशय फेडि तों कीं, तुझीआशा मज पासून सफळ होणार नाहीं.

## तात्पर्य

कार्या पुरतें पुढें पुढें होऊन आर्जव करणारे पुरुष आहेत ते, आपल्ये कडून दुसऱ्यास संतुष्ट करावें ह्मणून जंवजंव अधीक उद्योग करितात,

तंव

तंव तंव त्यांचा सुज्ञांस अधिकाधिक कंटा ळा येतो, त्यांचा स्वार्थ साधत नाहीं, आणि उद्यो ग निष्फळ जातो.

---

गोष्ट १२६

कोळसेविक्या आणि परीट

एक कोळसेविक्या, एका नगरांत धंद्याकरि तां गेला होता, तेथें त्याचे गांवचे परटाची आणि त्याची गांठ पडली, त्यांणीं एकामेकाचें क्षेमकु शळ पुसून बिराडें विचारिलीं; तेव्हां कोळसे वि क्या परिटास ह्मणाला, तुझें बिऱ्हाड सोईचें ना हीं, तूं माझे बिराडीं येऊन राहा. परीट ह्मणा ला, भिवा तें, कसें होईल; तुजसंगती राहिलों असतां मी जें वस्त्र प्रातःकाळीं धुवून आणीन त्या स, तुझे कोळशांची धूळ संध्याकाळ झालानाहीं तों काळें करील.

तात्पर्य

या जगांत कोणाशीं समागम करणें तो मोटा विचारपाऊन केला पाहिजे. आपण मोटे गुणी आहों, परंतु निरंतर दुर्गुण्याशीं जर संगत आहे तर, तो आपल्ये सारिखें करीलच. यास्तव जो विचारवंत आणि जो आपलें बरें इछितो आहे, त्याणें कुमनुष्यापासून दूर राहावें. त्याची संगती समूळ नाश करील. त्याचा समागम करून आपण निर्लेप राहिलों तथापि लोकांस तसें दिसणार नाहीं. संगतीच्या योगानें त्याचें आपलें असें मिसळून जाईल कीं, मग त्यांतील काळें त्याचें, आणि गोरें आपलें, इतकें निवडायाचा श्रम लोक घेणार नाहींत. प्रतिष्ठा ही स्वछ झऱ्याचे पाण्या सारिखी आहे, तें जसें गांवचो हळास मिळून वाहूं लागलें असतां गढूळ होतें, तसीच दुष्ट संगतीनें प्रतिष्ठा मलिन होते.

गोष्ट १३७

सारंग्या

एक सारंग्या, कलालाचे दुकानांत गाणें वाजिव ीं करून मद्यपी लोकांस फार रंजवीत असे. त्यांची नित्य वाहावा ऐकून त्यास असें वाटलें कीं, एके दिवशीं आपण नाटक सभेंत आपला गुण दाखवून द्रव्य आणि कीर्ती एकदांच मिळवावी. त्याची त्या विषयीं फार आर्ति पाहून नाटककारांनीं त्यास सभेंत नेला; तेव्हां तेथें जाग्याचे विस्तीर्णतेमुळें, आणि लोकांचे दाटीमुळें त्याचा स्वर व सारंगीचा नाद लोपून गेला, तो कोणास ऐकूं आलानाहीं; आणि ज्यां कोणां जवळचे लोकांस ऐकूं आला, त्यांणीं त्या ठिकाणीं मोटमोटे गवय्ये बजवय्ये यांचे ऐकिलें होतें, त्यांस तो ओंगळ आणि कर्कश लागला. ते समयीं त्यांणीं नाक मुरडतांच त्यासरिसें सर्वांनीं ऊयो ऊयो करून त्या सारंग्याची विटंबना केली, आणि त्यास सभे बाहेर हांकून दिलें.

## तात्पर्य

ज्यांणीं प्रशंसक किंवा नेणते लोक यांचे प्रशंसेवरून आपण्यास थोर मानिलें, ते लोकामध्यें उपहास पावले आहेत. एकादा विनोदी असतो, तो च्यार अनाडी लोकांची मंडळी रंजवूं शकतो, ह्मणून तो कांय पंडित लोकां पुढें, तोंड उघडून त्यांस संतोष करूं शकेल? यासाठीं केवळ रंजिवण्या कडेच लक्ष नदेतां, आपली योग्यता, ऐकणारांची योग्यता, व ज्या गुणानें रंजिवणार त्या गुणांत आपली परिपूर्णता, इतकें सगळें पाहिलें पाहिजे. नाहींतर केला श्रम व्यर्थ जाऊन उलट्या लोकांत उपहास मात्र होईल.

---

### गोष्ट १२८

### कृतघ्नकुचा ज्याणें मेंढा भक्षिल्या

एक धणगर आपल्ये कुत्र्यावर फारच विश्वास ठेवीत असे; बाहेर जाई तेव्हां त्याचे स्वाधीन

मेंढा

मेंढ्या करी, आणि त्यावर सर्वस्व टाकून स्वस्थ अ से. त्याकुत्र्यानें उत्साहानें चाकरी करावी ह्मणोन, त्यास तो नित्य लोणीभाकर चारी. त्याशीं गो ड शब्दांनीं बोले. पण इतकेंहि करीतअसतां त्याणें धन्याचे पाठी मागें एकादी मेंढी मा रून खावी. कांहिकां दिवसांनीं तें धनगरास उ मगलें तेव्हां, तो सहजच त्याचा प्राणघेऊं लागला. ते समयीं कुत्रा त्यास ह्मणतो, रे माझे धन्या, तूं माझे घातास नको प्रवर्त्तुं. पाहा! मी तुझा दीन जुना चाकर आहें; एक दुसरा अन्याय म ज पासून चुकून घडला असेल, तेवढ्यावरून तूं इतका निर्दय होऊन मला देहांत शासन करा वेंस हें तुला योग्य नव्हे. लांडगा तुझें नित्य श त्रुत्व करितो, त्याजवर कां तूं वैर उगवीसना? त्या स धनगर उत्तर करितो, अरे लुच्चा, तुला लांड ग्यापेक्षां शतगुणीत अधिक शासन असावें; कां कीं, लांडग्या पासून अपकारच व्हायाचा, हें मला पक्कें ठाऊक आहे, ह्मणून त्याविशीं मी नित्य जप त असतों. परंतु तूं माझा विश्वासू चाकर, मी

तुझे

तुझे भरंवशानें राहातों; तुला चांगले प्रकारें पो षितों; यासाठीं तुज पासून अपकार झाला तो, मला मोठा दुःसह आहे. तुझा कृतघ्नपणा क्ष मेस योग्य नाहीं.

तात्पर्य

ज्याचें आपण बरें केलें; ज्यावर आपण वि श्वास ठेविला; ज्यासंगतीं आपण मित्र बुद्धीनें चाल लों; त्यापासून अपकार झाला तो सोसवत ना हीं. त्याची क्षमा होत नाहीं. त्याचे अपकारा पासून जी व्यथा होत्ये तीचा शतांशही शत्रूचे अ पकारा पासून होतनाहीं. ह्मणोन असे अपरा ध्यास शासन करणें तें अन्याय तारतम्यानें करूं नये; आपल्ये व्यथे प्रमाणें करावें.

---

गोष्ट १३९

इंद्र आणि गाढव

एका माळ्याचा गाढव ओझीं वाहातां वाहातां कंटाळला, त्याणें इंद्राची प्रार्थना केली, देवा,

मला

मला दुसरा धनी दे. इंद्रानें त्यास कुंभाराचे स्वाधीन केलें; तो त्या कडून इटांची ओझीं वाहावुं लागला. त्यासही गाढव कंटाळून पुनः इंद्रा पाशीं विनवूं लागला कीं, कुंभाराहून दुसरा कोणी चांगला धनी द्यावा. नंतर इंद्रानें त्यास चाम्हाराचे स्वाधीन केलें. त्याजवळ राहून तो फारच पश्चात्तापांत पडला, आणि ह्मणतो, रे मूर्खा मी पाहा कसातो! हा चाह्मार तर त्या दोघां पेक्षां फारच दुष्ट. हा जिवंतपणीं काम घेऊन मी मेल्यावर माझें कातडेंहि घेणार.

## तात्पर्य

असल्ये स्थितीस कंटाळून नवे स्थितींत सुख होईल ह्मणून जे मानितात, ते अज्ञान. सुख दुःख हें सर्वां स्थितींत आहे; यासाठीं आपल्ये असल्ये स्थितींत संतुष्ट असावें, कांकिं, नव्ये स्थितींत सुखच होईल याचें प्रमाण नाहीं, कदाचित् अधिक दुःखहि होईल.

गोष्ट

## गोष्ट २४०

### गांवढेकरीउंदीर आणि नगरकरीउंदीर

एक साधा भोळा गांवढेकरीउंदीर होता; त्याचे घरीं दर्शनसंतोष, पुष्ट, असा एक नगरकरी उंदीर आला. त्याची याची जुनी ओळख होती, त्यावरून गांवढेकऱ्यानें त्याचा फारच पाहुणचार केला. जे पदार्थ आपल्ये घरीं अनुकूळ होते ते, व जवळच्या शेतांतील कांहीं कोंवळ्या कोंवळ्या गव्हांच्या ओंब्या, व वाटाण्याच्या शेंगा, व कांहीं भाकरीचे तुकडेहि, त्यापुढें ठेविले. याप्रमाणे गांवढ्यांत मिळत्या जितक्या परी होत्या, तितक्या त्याणें आपल्ये कडून मेळविल्या; परंतु नगरकऱ्यास त्या रुचल्या नाहीं. मग तो गांवढेकऱ्यास ह्मणूंलागला, वडील बाबा, मला आज्ञा द्याल तर मी अगळ मन मोकळेंकरून बोलतों; अहो, असे ह्या कंटाळवाण्ये जाग्यांत, तुह्मी राहतां तरि कसे? हें अरण्य; येथें आस पास गवत,

झाडें,

झाडें, डोंगर, आणि पाण्याचे ओहळ, या वे गळें दुसरें कांहीं दृष्टीपडावें नलगे; तर, या प क्ष्यांचे किलकिले पेक्षां मनुष्याचे शब्द बरे न व्हत बरें? या ओसाड राना पेक्षां राजधानी ब री नव्हे? तर मी ह्मणतों हें प्रमाण माना, आणि नगरांत चला; तेथें तुह्मी फार समाधान पावाल. आतां विचार करूं नका, लवकर चला. या मृ त्युलोकींची वस्ती क्षण भंगुर, एथें जो क्षण साधे ल तो आनंदांत घालवावा. अशा त्याच्या बढा ईच्या गोष्टी ऐकून ह्मातायास मोह पडला. म ग ते उभयतां तेथून निघाले, ते रात्र पडली ते व्हां नगरांत गेले. पुढें जात आहेत तों त्याणी एक मोटा वाडा पाहिला. तेथें आदल्ये दिवशीं च लग्नाचा समारंभ झाला होता; त्या वाड्या आंत जाऊन ते कोठींत शिरले. तेथें नानाप्रका रचे पदार्थ भरले होते, आणि कोणी मनुष्य न व्हते; तें पाहून गांवढेकऱ्यास फार आनंद झा ला. मग नगरकरी त्यास ह्मणतो, बाबा, आपण

खोलीच्या

खोलीच्या मध्यभागीं बसावें. मी एकएक पदार्थ देईन तो चाखून मला त्याची रुची सांगावी. मग तो नगरकरी उंदीर तेथें जितकीं फळें पक्वान्नें होतीं त्यांतून एकेक पदार्थ अनुक्रमानें आपल्ये पाऊण्यास देई, तो चाखून, डोळे मिटून, आहाहा! काय मिष्ट आहे हा! असें ह्मणोन गांवढेकरी त्याचा स्वाद वर्णन करी. याप्रमाणें एक घटका पर्यंत त्यांणीं आनंदांत काळ घालविला. इतक्यांत तिकडून कोणी कोठीचें दार उघडूं लागला, तें समजतांच दोघेही उडून एका कोनांत बसले. तितक्यांत दोन मोटे मातलेले बोके तेथें आले; त्यांणीं मोटा शब्द केला, तो ऐकून, गांवढेकरी उंदिराचा ऊर धाकानें धसधसां उडूं लागला. मग तो हळूच नगरकऱ्यास ह्मणतो, बाबा, असें जर तुझें नगरचें सुख आहे, तर तें तुझें तुला अक्षयी असो. मला माझें गांवढेंच बरें. तेथील शेतच्या शेंगा चांगल्या, परंतु रात्र दिवस जिवास धुसधुस होऊन एथें हें पक्वान्न खाणें नको.

## तात्पर्य

त्यागभोगापुरतें द्रव्य, आणि निरुपद्रव एकां त जर आहे तर, ग्रामवास बरा; नगरा मध्यें, नाना प्रकारचे शारीर आणि मानसीक, उपद्रव भोगून मोठे श्रीमंतार्इनें राहाणें कांहीं कामाचें नाहीं. ह्मणाल किं ग्रामवासांत इतकें सुख असतां, लोक नगरवास कां करितात? तर त्याची कारणें अनेक आहेत. कितीएकांस वा दासंबधीं राहाणें पडतें. कितीएकांस राजका जा साठीं. उदिमासाठीं. कितीएक, गुणी लोकां चा समागम व्हावा ह्मणून नगरांत राहाताहेत. कोणी आपले वडील राहात आले ह्मणून; को णी सुल्हत्संबंध्यांसाठीं. नगर हें संपत्ती मिळ विण्याचें स्थळ आहे, ह्मणून कितीएक विद्वान् कुशळ आहेत ते, नगरीं वास करून इछितात कीं, अमुक परिमाण द्रव्य मिळालें ह्मणजे, आपल्ये गा वीं जाऊन सुख भोगूं. दुसरे कितीएक, जन्मव र नगरामध्यें कष्ट करितात; त्यांचे मनांत इछा

कीं, म्हातारपणीं नगर सोडून एकादे नदीतीरा स अथवा तीर्थास जाऊन सुखानें आयुष्य घाल वूं. एवंच नगरवासी लोकामध्यें बहुत करून असा कोणी आढळत नाहीं कीं, ज्याचे मनांत ग्रामवासा विषींची योजना नाहीं. मोटे मोटे जु नाट कवींनीं ही वर्णनकेलें आहे किं, मनस्वस्थ ठे वायास, पुण्य कर्म आचरण करायास, अथवा आरोग्य भोगायास, विजनवासा प्रमाणें दुसरें साधन नाहीं.

---

## गोष्ट २४२

### उंदिर आणि चोपई

एक बुभुक्षित रोडका उंदीर होता, त्याणें मो ठे सायासानें एके धांन्याचे कोठारास एका को नाकडचे आंगून भोंक पाडिलें, आणि त्यांत शि रला. तेथें कांहीं दिवस यथेष्ट दाणा खाऊन

पुष्ट

पुष्ट जाहाला. एके दिवशीं त्याणें कोठारांतून बाहेर निघण्याविशीं मोठा यत्न केला, परंतु मोटें झालेलें त्याचें आंग, त्या भोकांतून बाहेर येईना. तें पाहून जवळ एक चोपई होती ती त्यास ह्मणत्ये, मित्रा, जर तूं आपली सुटका क रायास इच्छितो आहेस तर, यास उपाय हा एकच: तूं पूर्वीं जसा रोडका होतास तसा हो; ह्मणजे मला वाटतें किं दैव बरोबर घेऊन सुटोन जाशील.

## तात्पर्य

जो गरीबींतून श्रीमंताईस चढला त्यास, बहुत करून गरीबीचीं सुखें भोगायास सांपडत नाहींत. गरीबींत जीं सुखें आहेत तीं श्रीमंतींत नाहींत: श्रीमंता मागें अनेक अवरोध उपाधी असतात, त्या गरीबांस नाहींत. तर जो त्यां उपाधींस कंटाळेल त्याणें संपत्तीस कंटाळलें पाहिजे, तरच इच्छिलें सुख पावेल, दुसरा उपाय नाहीं.

## गोष्ट १४२

### पोट आणि अवयव

कोणी एका काळीं हात पायादिक अवयवा नीं विचार केला कीं, आपण मोठा श्रम करून मिळवावें आणि या पोटानें रिकामें बसून खा वें, हें कां? तर आजपर्यंत जें झालें तें झालें, या उपरि याणें स्वयें उद्योग करून आपलें पोष ण करावें, आह्मास याची गरज नाहीं. असें ह्म णून सर्वांनीं आणा वाहिल्या. हात ह्मणाले आ ह्मी जर अतःपर याकरितां एक बोट हालवूं, तर आमचीं सर्व बोटें तुटून पडोत. तोंड ह्म णालें मी शपत करितों, जर मी याकरितां ए क घांस घेईन तर मला किडे पडोत. दांत ह्म णाले जर याकरितां आह्मी घांस चावूं, तर आ मचें निसंतान होऊ. याप्रमाणें शपता घेऊन निश्चय केला तो सर्वांस मोठे निकरानें राखणें प्राप्त झाला. शेवटीं अशी अवस्था झाली कीं, स र्व अवयव सुकोन गेले; अस्थि आणि चर्म मात्र

शेष

शेष राहिलीं. ते समयीं, सर्वांचे डोळे उघडले कीं, आपण गोष्ट वाईट केली. पोटा वांचून आपला परिणाम नाहीं. तें स्वयें उद्योग करी तनाहीं खरें; परंतु जितकें आपल्ये योगानें त्याचें पोषण, तितकेंच त्याचे योगानें आपलें पोषण होतें.

तात्पर्य

कोणे एकासमयीं एके राजधानींत असें झालें कीं बहुकाळ युद्ध प्रसंगा मुळें, सरकारांत द्रव्याचा तोटा पडून, राजा आपल्ये प्रजेपाशीं वारंवार पट्टी मागत गेला. त्या उपद्रवास कंटाळून सर्व प्रजा नगरा बाहेर निघोन गेली, तेथें सर्वांनी एक कट केला कीं, आपण खपावें आणि सरकारानें आयतें खावें हें कां? तर यतःपर आपण सरकारास कांहीं देऊंनये. असो त्यांचा निग्रह पाहून राजानें आपला प्रधान त्यांजकडे पाठविला. त्याणें त्यांस ही पोट आणि अवयवांची गोष्ट सांगीतली. ती ऐकतांच ते राजास अनकूळ झाले, आणि राजा प्रजा उभयतांही

सुखी

सुखी झालीं. सारांश कीं, आपण सरकारास द्रव्य दिल्हें नाहीं तर, त्याचा खर्च सहजच आटोपला तें झालें असतां चोरावें उठोन दिवसा ढवळ्या दरवडे पडतील. कोणी कोणाचें ऐकणार नाहीं; आणि पुढावें मातोन, राजा आणि प्रजा दोघांचाही एकदांच नाश होईल.

—००❊००—

गोष्ट १४३

गाढव सिंह आणि कोंबडा

एक गाढव, आणि कोंबडा, हे दोघे, एके ठायीं चरत होते; इतक्यांत समोरून एक सिंह येत होता तो त्यांणीं पाहिला. ते समयीं कोंबड्यानें मोठा शब्द केला. सिंह कोंबड्याचे शब्दास फार भीत असतो, त्याणें तो शब्द कानीं पडतांच, मोठे त्वरेनें मागें धांव घेतली. तें पाहून गाढवास वाटलें कीं, तो आपणास भिऊन

पळाला.

पळाला, ह्मणोन तो धांव करून सिंहा मा गें लागला; तो कोंवळ्याचा शब्द ऐकू येईना इ तका दूर गेला असतां सिंहानें मागें उलट खा ऊन त्याची नरडी धरिली. त्यावेळीं गाढव म नांत ह्मणतो; हरहर! मी मूर्ख कितो तो पाहा! आपला षंढ पणा जाणत असतां हि, उसनें अ वसान आणून या मृत्युचे तोंडांत पडलों; नाहीं तर यावेळेस आपल्ये कुटुंबांत स्वस्थ असतों.

तात्पर्य

ज्यांचें अवसान नसतां जो तें उसनें आणावा स जातो, तो फशीं पडतो. ठिकाणाचे अथवा संगतीचे महात्म्यानें एकादे समयीं आपल्यास को णहीं स्याला, त्याजवरून तो आपणास दवतो अ सा निश्चय करून त्याशीं एकाकीं गांठ घालाया स जाऊंनये. त्याचें आपलें सामर्थ्य पाहून वर्तावें.

## गोष्ट १४४

## वानर आणि कोल्हा

एक वानर कोल्ह्याची प्रार्थना करून ह्मणूं लागला कीं, तुझें लांब आणि गोंडस शेंपटींतील लाहानसा तुकडा मला देशील तर मी माझें ढुंगण झांकीन; ह्मणजे मला थंडी वाऱ्याचा उपद्रव होणार नाहीं. तुझी शेंपटी तुला पुरून अधीक आहे; आणि थोडी तूं धुळींत मळवितोस; तर त्यांतून थोडीशी मला दिल्हानें तुला अडचण न पडून माझें काम होईल. कोल्हा उत्तर करितो रे, तूं शेंपटी अधीक आहे ह्मणून ह्मणतोस तें काय असेल तें असो, तुला समजत नाहीं; परंतु मी तुला सांगतों कीं, मी मरें पर्यंत आपली शेंपटी अशीच धुळींत लोळवीन, पण यांतला एक केसही, तुला प्राप्त होणार नाहीं.

तात्पर्य

कितीएक लोकांपाशीं अधिक द्रव्य असतें कीं त्यांचे निर्वाहास पुरून पुष्कळ उरे; असें असतां हि त्यांस लोभानें वाटतअसावें, कि आणिखो हि मिळेल तर बरें. मग अशा कल्पना होतअ सतां, आडे त्यांतून एक कपर्दिकहि त्यांची परोप कारीं लागतनाहीं.

---

गोष्ट १४५

गाढव आणि कुत्रा

एकेसमयीं गाढवानें मनांत आणिले कीं, जिम ध्ये कुत्र्यावर आपला धनी अत्यंत प्रीति करितो, मर मीही तसा उडलों, बागडलों, शेंपटी हाल विली, आणि मांडीवर चढून बसलों तर, धन्याचा लाडका होईन. असा विचार करितो आहे, इ तक्यांत त्याचा धनी शेतावर गेला होता तो घरीं आला; आणि आंगण्यांत खोल्यावर बसला आ हे तों, गाढव त्यासमोर येऊन, प्रथम इकडून

तिकडे

तिकडे उड्या मारूं लागला; मग त्यानें स्वर काढून ओरडला; तें पाहून धन्यास खदखदां हांसूं आलें, आणि मोठें कौतुकसें वाटलें. दोहीं चोहीं पळांनी तेंच कौतुक त्याचे जिवावर आलें; त्या गाढवानें आपले मागले पायांवर उभें राहून, पुढचे दोन्ही पाय मोठे आवडीनें धन्याचे उरावर ठेविले; आणि आतां पुढें त्याचे मांडीवर बसणार इतक्यांत, त्याणें आरोळी केली, ती ऐकून घरांतून एक चाकर हातांत दंडा घेऊन धांवून आला; त्याणें त्या गाढवाचीं हाडें ठेंचून मोकळीं केलीं; आणि त्याचे मनांत आणून दिल्हें कीं, धन्याचे कृपेंतलें होणें हें सर्वांसच साधत नाहीं.

तात्पर्य

कितीएक पुरुष चिमण्ये कुत्र्या सारिख्या चेष्टा करून आपल्ये धन्यास रंजवितात, तें तसले असतात त्यांसच साधतें; दुसरा करूं जाईल तो गाढवा सारिखा फशीं पडेल. कांकिं मनुष्य स

नुष्याची

मनुष्याची प्रकृती प्रकार प्रकारची असल्ये; तीस र
मवाथाचे विषयही भिन्नभिन्न असताहेत.

---

## गोष्ट १४६

### पशु पक्षी आणि वागुळ

एकेसमयीं पशु आणि पक्षी यांमध्यें मोठें दारुण युद्ध लागलें. तेव्हां वागळानें विचार केला कीं, आपल्ये शरीराच्ये घडणीवरून आपण पक्षी कीं पशु, याचा लोकांस संदेह आहे तो आज आपल्ये पथ्यावर आहे. तर आपण वेगळें राहून काय होतें तें आधिं पाहूंया, मग व्हावा तो पक्ष धरितां येईल. इतक्यांत दोन्ही दळें समरंगणीं एकवटून मोठीच दाणमार चालली. ती पाहून पहिल्यानें वागळास असें वाटलें कीं, पक्ष्यांची जीत होईल; ह्मणोन तो त्यांचे मंडळीकडे आला; आणि दुरूनच डवरूनडवरून खुशीत होता कीं, सधीक उणें तर तशीच वर्तणूक करीन. मग कांहीका वे

ळाने

ळानें पशूंचें सैन्य जय पावेलसें ज्यास दिसलें; ते
व्हां तो त्यांजकडे जाऊन त्यांस म्हणूं लागला,
कीं उंदराचे आणि माझें तोंडास कांहीं मि
ळतें ह्मणोन मी पक्षी नव्हें पशू आहें; मला आ
पल्ये मंडळींत घ्या. मी सदां तुमचें कल्याण हृ
दयांत वागवीन, आणि तुह्माशीं कधींही विपरीत
होणार नाहीं. पशूंनी तें मान्यकेलें. शेवटीं ग
रुडानें मोठा पराक्रम करून पशूंचा सर्वथा मो
ड केला, तेसमयीं तें वाघूळ आपला प्राण वांचावा,
आणि जातीचे हातीं लागून आपली अप्रतिष्ठा
होऊंनये, ह्मणोन तेथून पळालें तें, तेव्हांपासून
झाडांचे ढोलींत, गिरिकंदरांत, शिरकून राहिलें
आहे. तें अद्यापी, रात्रपडल्ये आणि सर्व पक्षी
आप आपल्ये स्थळीं निजायास जातात, तेव्हां बा
हेर पडत असतें.

तात्पर्य.

अवघीं मिळून आपले जातीचा घातकरणें, या
सारिखें नीच कर्म दुसरें नाहीं. तें जेकरितात

त्यांची उघडीक झालीअसतां, ते जीवास मुकता त. कदाचित वांचले तर, त्यांस सुष्टींत तोंड दा खवायास जागा नाहीं. ते पापी जेथें जातात ते थें त्यांचा लोक कंटाळाच करितात.

---

गोष्ट १४७

कोंबडा आणि कोल्हा

एक कोंबडा एका उंचा झाडाचे खांदीवर बसू न मोठ्यानें आरडत होता; त्यासाठीं त्याचे शब्दा चा सर्व अरण्यांत भडभार उठे. एक कोल्हा भ क्षाचे शोधांत तेथें जवळच फिरत होता, तो शब्द ऐकून त्या जागीं आला, आणि पाहातो तों उंच ठिकाणी मुळें कोंबडा हातीं येईलसें दिसे ना. मग त्यास भुलथाप देऊन खालीं आणावा ह्मणून त्याणें कपट आरंभिलें. तो झाडा जवळ जाऊन त्यास ह्मणतो, आऊ, तुला पाहून मी फार समाधान पावलों. पण तूं आहेस तेथें चे

ऊन माझ्यानें तुला आलिंगन देववत नाहीं. त
र मला वाटतें कीं तूं लवकरच खालीं येशील,
आणि मला भेट देशील नव्हे बरें? कोंबडा ह्म
णतो, कोल्हे दादा, मी तुला खरेंच सांगतों, ख
लीं येणें हें मला निर्धोक दिसत नाहीं; वे तूं
माझा मित्र, मला तुजपासून जरी भय नाहीं झा
लें, तरी मी दुसरे कोणाचे हातीं सापडलों त
र माझी अवस्था कठिण कीं? कोल्हा उत्तर क
रितो रे, माझे जिवलगा, रे, नुकताच पशूंचा आ
णि पक्ष्यांचा संधि झाला आहे; आणि असें ठरलें
आहे कीं, अतःपर कोणी कोणाचा घात करूं न
ये. सर्वांनीं गोडीनें राहावें. आणि जो हा सं
धि मोडील, त्यास मोटें पारिपत्य करावें. ही
गोष्ट प्रख्यात झाली आहे, आणि तुझारे अजून
कशी समजली नाहीं; हें बाबा मोटें नवल वाट
तें. असें कोल्हा बोलतो आहे, तें कान देऊन
कोंबडा ऐकत होता; इतक्यांत मान बाहेर का
ढून दूर पाहूं लागला. त्यास कोल्ह्यानें विचा

रिलें,

दिलें, दादा, तूं इतक्या सादर काय पाहातो आहेस तें मला सांगशील? कोंबडा ह्मणतो गड्या, तें, दूर, पांच सात पारध्याचे कुत्रे येताहेतसें मला दिसतें. कोल्हा ह्मणाला असें आहेतर बाबा तुमची आमची रामराम; मी जातों. कोंबडा ह्मणतो, रे दादा, हांहां! जाऊं नको; मी आतां लवकर च खालीं येतों; मला वाटतें कीं आज सर्वत्र संधी आहे त्यापेक्षां, कुत्र्यांपासून तुला भय नाहीं. कोल्हा उत्तर करितो, नाहींरे बाबा; संधी प्रख्यात झाला आहे खरा, पण तो त्यां कुत्र्यांस अजून ठाउक झाला असेल कीं नाहीं, हें कोण जाणे?

तात्पर्य

ठकानें ठकास ठकविलें पाहून फार समाधान वाटतें. धूर्ताची वाणी चंदना सारिखी शीतळ, परंतु त्याचे अंतरीं कातर असते; यासाठीं, मिळित्ता पांचून फारच ममतेचें भाषण दृष्टीस पड

तें

तें, तेथें विशेष सावधगिरीनें असावें. जो कोणी आपल्ये शाहाणपणानें, असल्ये धूर्तांचे मायापाश ओळखून त्याचे हातीं सांपडत नाहीं; त्यास उलटा पस्ताव्यांत घालतो; तो पुरुष मोठा दक्ष ह्मणावा.

———०※०———

## गोष्ट १४८

### कुळंबी आणि त्याचे लेंक

कोणी एक कुळंबी मरायास टेंकला होता; त्याचे मनांत आलें कीं, आपण आजपर्यंत धंदा चालविला आहे, तसाच आपल्या मागें सदोदित मुलांनी चालवावा. तेव्हां त्याणें ही युक्ति केली. अवघ्या मुलांस खाटे जवळ बोलावून सांगितलें, मुलांनों, माझें काय जें आहे, तें हीं शेतें आणि वाड्या आहेत; याचे धणी तुह्मी सर्व मिळून आहांच. परकड काय जो माझा ठेवा असेल तो, कोठेंही, त्यां शेतामध्यें हातभर भुईं खालीं

पुरलेला आहे. ह्यांतील मी शेतें तुह्मी दुसरे कोणाचे हातीं लागूं देऊनये बरें? तें ऐकून पु त्रांनी निश्चय केला कीं, ह्मातार्‍यानें कांहीं द्रव्य शे तांमध्यें पुरून ठेविलें आहे. मग तो कुळंबी वा रल्या नंतर त्याहीं तीं शेतें, लागवडीचे निमित्ता नें, हातहातभर उकरून पाहिलीं; त्यांत त्यांस ठेवातर सांपडला नाहीं; परंतु भुई चांगली नांग रली, त्यामुळें त्यां शेतांत लावलेला दाणा दशगु णीत झाला; आणि त्यांस बहुत द्रव्य लाभ झाला.

तात्पर्य

चांगली कुशळता आणि उद्योग जेथें आहेत, ते थें द्रव्यलाभ अवश्य आहेच. उद्योगांत उद्योग ह किर्सा सारिखा दुसरा नाहीं. तो जे स्वतें क रितात, त्यांस परिश्रम होतो, त्यामुळें एकतर आ रोग्य लाभ; दुसरें, या संसारांत निर्वाहास ज्या वस्तु पाहिजेत त्यांचा तोटा पडत नाहीं. यास्ता वीं शेती अथवा बाग्या, सर्वांनी थोडे आवडीनें

कराव्या.

करावा. त्यांत केला श्रम तो निश्चयें करून व्यर्थ जात नाहीं. ज्याचे लाभास धोका नाहीं असा हा एकच धंदा आहे; याचे करणारास चोर सर्वस्वीं नागवूं शकत नाहीं.

---

## गोष्ट १४९

### घोडा आणि सिंह

एक माजलेला घोडा पाहून, एके सिंहास फार अभिलाषा लागली कीं, याचे मांसाचा एक तुकडा जरी तोंडास मिळता तरी बरें होतें. पण तो घोडा आपल्ये हातीं लागावा म्हणून सिंहानें वैद्याचें सोंग घेतलें; आणि सर्व पशूंस कळविलें कीं, मी देशोदेश फिरून नानाप्रकारचे औषधांचे, वनस्पतींचे, अनुभव घेतले आहेत. माझे हातून पशूंचा कोणताही रोग बरा झाल्या वांचून राहिला नाहीं. घोड्यानें त्याचीं मांडलें ओळ

खून

खून मनांत म्हटलें कीं, आपणहि ठकविद्या करू न यास ठकवावा. मग तो घोडा भोळेपणा दा खवून सिंहापाशीं लंगडत लंगडत आला; आणि सांगूं लागला, वैद्य बावा, माझे मागले पायांत कांटा रुतोन मी फार हैराण आहें. कृपा करू न कांहीं उपाय करावा. सिंह ह्मणाला, मला जवळ ये, मला तुझा पाय पाहूंदे. मग सिंहापा शीं जाऊन घोड्यानें मागील पायांची जी एक लात झाडिली, तेणें करून सिंहाचा जबडा फुटून तो कें कावतच राहिला; आणि घोडा चौपायीं उडून निघोन गेला; मनांत बहुत समाधान पावला कीं, मी असें यास ठकविलें, जो मला ठकविणार होता.

तात्पर्य

ठकास ठकवून फार समाधान वाटतें. यद्यपि कृत्रिम करणें, ठकविणें, हें सर्वथा नीचांचें कर्म, थो रांस योग्य नव्हे; तथापि आपणास ठकवावयास जो आला त्याजवळ कपट करून त्याचा मनोरथ सि द्धीस जाऊं न देणें, ही नीती होय.

गोष्ट १५०

## सिंह आस्वल आणि कोल्हा

एके अरण्या मध्यें सिंह, आणि आस्वल, हे दोघे दोहों कडून धांवून एके हरणाचे पोटा जवळ एकदांच पोहोंचले; मग त्या विषयीं दोघांचें भांडण होऊन फार वेळ युद्ध जाहालें. तेव्हां उभयतांहि घायाळ होऊन, थकून भुईवर पडले. इतक्यांत अकस्मात् त्यावाटेनें एक कोल्हा जात होता, तो त्यांची अवस्था पाहून धटाईनें, दोघांचे मध्यें आला; आणि हरणास घेऊन गेला. ते दोघे लढवय्ये, परंतु पाहातच राहिले; शक्ती नाहीं त्यामुळें त्यास अडथळा करूं शकले नाहीं. तेसमयीं उभयतांस विचार होऊन ते आपले ठायीं आपल्यास म्हणतात; अहो, पहा फळ हें आमचे भांडणाचें; तो लुच्चा, आमिष घेऊन चालिला; आणि आह्मी एक मेकास असें केलें आहे कीं, त्याचे हातून तें सोडवावयाचीहि शक्ती ठेविली नाहीं.

तात्पर्य

## तात्पर्य

एकादे पदार्था करितां भांडून लोक न्याया धी शींत निवाडा करावयास जातात; तेथें वकील अ सतात त्यांस ती सुबड फावळे. हे भांडून भांडू न थकतात आणि त्यांस लाभ होतो. न्याय या शब्दाचा अर्थ विचार केला असतां केवळ नीती च; परंतु तोच न्याय मनुष्याचे आपत्तीस कारण जाला आहे. या न्यायाचे भरंवशानें ओढलेले कितीएक भिकेस लागले. कितीकांनी हट्टास पे टून रिण काढून आपल्यास संकटांत घातिलें. म नांत कीं, आपणा बरोबर दुसऱ्याची विपत्ती करा वी. तर असे लोकांनी पैसा खर्च करून विपत्तीं त जें पडावें, त्यापेक्षां चौघे शाहाणे असे मनुष्य घेऊन तंटा कां चुकवू नये. म्हटलें आहे कीं, जर मनुष्यें नीतिमान आणि भक्तिमान् अशीं हो तील तर, त्यांस परमार्थाची वाट दाखवणारे न कोत. शिताहाऱ्यांस वैद्याचें काम लागणार ना हीं. जे न्यायानें चालतील; प्रमाणीकपणा वा

भांडतील; परस्परांत कांहीं असमजूत पडल्यास, तो बांधा, आवडीनें एकादे तिराइतावर टाकून, त्याणें सांगितलेली गोष्ट ऐकतील, तर त्यांस न्यायाधीशांतील वकिलांचें काम पडणार नाहीं. तिराइतावरही जेथें उलगडा होईना, अशी एकादी गोष्ट आहे तेथें जो धर्मशास्त्र जाणता, भला, जो ब्राह्मणपणाविषयीं प्रसिद्ध, अशा एकाद्यास वृत्त समजावून, त्याणें सांगितल्या प्रमाणें चालावें हें योग्य आहे. त्याहही जेथें उकल पडत नाहीं, अशी संदेहयुक्त गोष्ट आहे; तेथें तोड जोड करून आपल्या आपणांत तंटा चुकविल्यांत कल्याण आहे.

—∞❋∞—

## गोष्ट १५१.

## उंदरांची सभा.

एके समयीं उंदीर आपली मंडळी मिळवून विचार करूं लागले, कीं मांजरा पासून आपले प्राण राखावया विषयीं सबळ अशी युक्ती कोणती?

तेथें

तेथें उदंड कल्पना निघाल्या; आणि पुष्कळ भवति नभवति झाली. तेसमयीं एके तरणे उंदिराने पुढें होऊन मोठें पांडित्य करून शेवटीं सिद्ध केलें कीं, यास एकच युक्ती; मांजराचे गळ्यांत घांट बांधावी, ह्मणजे ती अमळ हालली कीं, सावध होऊन आपणास आपआपल्ये बिळांत जातां येईल. तें ऐकून सर्वांनी, वाहावा चांगली युक्ती, ह्मणून मान डोलविली; आणि त्यांतून कितीक ह्मणूंलागले कीं, या उंदिरास सर्वांपासून एक मानपत्र असावें. तेथें एक म्हातारा उंदीर होता; तो तें सर्व ऐकून घेऊन उभाराहिला; आणि ह्मणतो, गड्याहो, कल्पना तर बहुत सुंदर आहे; आणि तिचा कल्पिताहि अत्यंत कुशळ आहे खरा, यांत संशय नाहीं; परंतु त्याचे मुखें मला अजून इतकें समजलें पाहिजे कीं, मांजराचे गळ्यांत ती घांट कशी बांधावी; आणि कोणता उंदीर तें काम पतकरतो. हें कळे पर्यंत आपण त्यास मानपत्र देऊंनये. तें ऐकून सर्वांनीं त्या तरणे उंदिराचा उपहास केला.

तात्पर्य

### तात्पर्य

तोंडचे योजनेंत पुष्कळ गोष्टी सुलभ दिसतात, परंतु करूं लागलें असतां समजतें कीं, दुष्कर आहेत. यासाठीं जो पुरुष एकादी युक्ती सांगायास पुढें होतो, त्याणें ती कशी सुकर होईल हें प्रत्ययास आणून दिल्या वांचून त्यास नावाजूं नये.

———○❋○———

### गोष्ट १५२

### सिंह, गाढव, आणि कोल्हा.

एके समयीं सिंह, गाढव, आणि कोल्हा, यां तिघांचा करार झाला कीं, आपण मृगयेस जाऊं, आणि जें मिळेल तें वांटून घेऊं. नंतर त्यांणीं एक पुष्ट सांबर मारिला; त्याचे भाग कर ह्मणोग सिंहानें गाढवास सांगितलें. त्यावरून गाढवानें सारिखे तीन वांटे करितांच, सिंहास क्रोध येऊन त्याणें क्षण न लागतां गाढवाचीं आंतडीं बाहेर काढिलीं. मग सिंहानें तें काम कोल्ह्यास सांगितलें, किं आतां तूं याचे भाग कर. ते

व्हां कोल्हा आह्मणाच; तो त्यांतला एक खासा मला तुकडा तोडून सिंहास ह्मणाला, राजाधिराज, मला इतका पुष्काळ; उरला सर्व आपण अंगीकारावा. हें पाहून सिंह फार संतुष्ट झाला, आणि त्यास विचारिता, बाबा, ही असी राजमान्य रीति तुला कोणी शिकविली; तो ह्मणाला महाराज, खरेंच पुसाल तर या विषयीं माझा गुरु हा समोरला गाढवच.

तात्पर्य

जो चित्त देऊन शिक्षा घेऊं लागेल, त्यास लोकांचे आचरणाचे परिणाम पाहून, पुष्काळ गोष्टी समजतील. मागील काळचे पुरुषांच्या कथा, व सांप्रत काळीं जें होतें तें, यांचें मनन केलें असतां, त्यांत आपल्ये वर्त्तणुकी विषीं सर्व प्रकारचे दृष्टांत मिळतील; आणि त्यांपासून बहुत हित होईल. दुसरा पूरांत वाहावला, तें पाहून, त्याचें वाहावणें आपला बचाव करितें. दुसऱ्यास ठें

च लागली पाहून आपण जपून चालतो. ह्मण न जो असा, पदार्थ माना पाहून गुणदोष घे तो, त्यास कोणत्ये समयीं कसें चालावें; आपणा हून थोर अथवा आपल्ये बरोबरीचे, किंवा आ पल्ये खालचे यांशिं कसें वर्तावें, इत्यादीका विष यीं अडचण पडत नाहीं.

---

गोष्ट १५३

म्हातारा सिंह

कोणी एक म्हातारा सिंह मरावयास पडला; तें ऐकून ज्यांस ज्यांस पूर्वी त्यापासून उपद्रव झा ले होते ते पशु, आपआपला सूड उगवावयास त्यापाशीं आले. डुकरानें आपली दाढ पाजळू न त्याचे पोटांत रोंविली, अशी निघृणतेची सळी. बैलानें त्यास शिंगें मारून रक्तबंबाळ केला. तें निभावला पाहून, गाढवही पुढें झाला; त्याणें ला

गच्या तंगड्या उचलून सिंहाचे तोंडावर लाता झाडिल्या. तेव्हां तो बापडा सिंह, प्राण सोडिते वेळेस ह्मणाला; हरहर! देवा काय दुःखहें! अहो, शूर आणि पराक्रमी यांचेही हातून जो छळ सोसा यास कठीण, तो असल्या नीच पशूंचे हातून सोसितों, यापेक्षां मला सहस्र मृत्यूचें दुःख कठीण वाटत नाहीं.

## तात्पर्य

आपल्यास अभिमानानें मानावें, उपद्रव करून ये, अशी इच्छा आहे तर, आपण लोकांचें हित करीत असावें; उगीच कोणी कोणास मानीत नाहीं. यासाठीं ज्यास थोरपणा मिळवणें, आणि तो मागें वंश परंपरेसही चालिवणें, त्याणें, तो सन्मार्गानें संपादावा, मग त्यास कोणी ही छळणार नाहीं. आणि संकट समयीं त्यास वैरी दृष्टीस पडणार नाहींत; जिकडे पाहील तिकडे साह्यकर्ते आणि मित्रच दृष्टीस पडतील.

गोष्ट १५४

म्हातारा आणि त्याचे लेंक

एक म्हाताऱ्यास पांच लेंक होते, ते आप आपल्यांत नित्य भांडत; म्हणून त्याणें त्यांस धम की देऊन पाहिली; सामोप चारानें ही पुष्कळ सांगितलें; परंतु तें सर्व व्यर्थ गेलें. तेव्हां शेवटीं त्याणें, ही युक्ती केली. त्यां लेंकांस आपले स मोर बोलाऊन, एक काठ्यांची जुडी आणविली, आणि प्रत्येकास सांगीतलें कीं तुह्यांत जितकी श क्ती असेल तितकी करून, ही जुडी मला मोडून दे. त्यां सर्वांनी हि मोठा नेट केला; परंतु जु डींतील काठ्या एक मेकाचे आश्रयाने होत्या, त्या कोणाच्यानें ही मोडविल्या नाहीं. नंतर म्हा ताऱ्यानें तीच जुडी मोकळी करून, त्यांतील ए कएक काठी एक एकाचे हातीं दिल्ही; आणि पूर्ववत् मोडावयास सांगीतली; मग त्या आवघ्या काठ्या त्याणी एक क्षणांत मोडून टाकिल्या. तेव्हां

बाप

बाप त्यांस सांगतो, मुलांनो, पाहिलेंतना हें एकी चें सामर्थ्य? तुह्मी असेच सख्यत्वानें एकमेका स आश्रय करून राहाल तर, तुह्मास उपद्रव क रण्या विषयीं इंद्राची ही शक्ती चालणार नाहीं. तोच सख्यत्वाचा आश्रय एकवेळ सुटला असतां मग, भलती एकादी रांड तुह्मास क्षण न लागतां मारूं शकेल.

### तात्पर्य

निरंतर आपलें बरें व्हावें असें मनांत आहे तर, मनुष्यांनी परस्पर एकी आणि मैत्री यां स दृढ राखावें. ज्या राज्यांत, अथवा कुटुंबां त, जितकी एकी उणी, आणि तुकडा अधीक, तितकें तें राज्य, आणि कुटुंब, विशेष शक्ति हीन, शत्रूस सुसाध्य होतें. ह्मटलें आहे; जे आपआपल्यांत भांडतात, ते आपले लयाचें कारण आपण होतात. याजकरितां, राज्यांत, जातींत, मंडळींत, कुटुंबांत, अथवा जेथेजेथे चौ घे एक होऊन एकादें काज आरंभितात त्यांत, क

लह

लह शिरला ह्मणजे जाणावें, कीं विनाशकाळ ज वळच आला. जे एके आई बापाचे पोटीं जन्म ले, त्यांस तर एकमतानें वागणें, एकमेकाचें हि त करणें, हें साहजीक असावें; कोणी सांगीतल्या वर करावें असें नाहीं. दुःखास वांटेकरी अस ले ह्मणजे दुःख हलकें होतें, आणि सुखास अस ले तर सुख दुणावतें.



गोष्ट १५५

म्हातारी आणि तीच्या बटकी

एक म्हातारीच्या बटकी होत्या, त्यांस ती नि त्य कोंबडे आरवणी उठवून कामास लावीत अ से. कोणे एकेसमयीं त्या बटकींनीं विचार केला कीं, हा दुष्ट कोंबडा, आपली साखर झोंप मोड वितो, यास मारून टाकावा; ह्मणजे आपणास म्हातारीचा उपद्रव होणार नाहीं. मग त्यांणी

तसें

तसें केलें, आणि मनांत आणिलें, कीं, आतां उजाडे पर्यंत, ह्मातारी आपणास उठविणार नाहीं. ह्मातारीस तें सर्व कळलें; मग बटकीस शिक्षा व्हावी ह्मणून ती, त्या दिवसा पासून त्यांस, मध्यरात्रीस उठवूं लागली.

## तात्पर्य

कांहि एक करायाचे पूर्वीं, त्याचा परिणाम कसा होईल याचा विचार करावा; नाहिं तर सुखा करितां उद्योग केला तो दुःखा स्तव होतो.

———o❋o———

## गोष्ट १५६

## मोर आणि कावळा

एके समयीं, आपल्यावर राजा नेमावा, ह्मणून सर्व पक्षी एकत्र झाले होते. त्या प्रसंगीं मोर पुढें झाला; त्याणें, आपलीं सोनेरी पिसें, उभीं करून त्यांचे शोभे कडेस सर्वांचे डोळे वेधिले. तेवे

ळीं

ळीं बकनांनीं त्यास राजा करण्या विषयीं रुकार दिला; आणि त्याची मोटी प्रशंसा करून संतोषानें पांख वरती केले. पुढें विचार करून त्यास राज्यपदावर स्थापीत करणार तों, कावळा पुढें झाला, आणि मोरास बोलतो; राजाधिराज, आपले दासानुदासास एक शंका उत्पन्न झाली आहे; आज्ञा होईल तर बोलेन. मोर ह्मणाला सुखें बोलावा. कावळा ह्मणतो महाराज, आह्मी आपणास राजे करून आमचे प्राण आपल्ये स्वाधीन केले; आतां आमचा सर्व भरवसा आपणावर आहे; परंतु जर कदाचित गरुड, गीध, अथवा घार, यांणीं आह्मां गरिबांवर घाला घातला, आणि ते घालतीलच, तर त्यांचा पराजय स्वामी कोणत्या रीतीनें करितील; एवढें सांगून आमचें भय निवारण करावें. तो प्रश्न मंडळीनें ऐकतांच त्यांस तत्क्षणी विचार उत्पन्न होऊन त्यांणीं ह्मटलें कीं, गोष्ट खरी; आपलें संरक्षण या नाजूक, देखणें पक्ष्याचें ह्मणून व्हावयाचें नाहीं; त्यास हा राजा उपयोगी नाहीं.

### तात्पर्य

कोणत्येही मंडळीनें, आपला मुख्य योजणें तो, त्याचे बाहेरचे शोभेस भुलून योजूं नये. सर्वांचें हित कराया विषयीं ज्यांत गुण आहेत, व शक्ती आहे; जो शाहाणा, चतुर, असा जो, त्यासच यो जावें. तें लोक करीत नाहींत, आणि तुसत्ये श्री मंताईवर दृष्टी देऊन मूर्खांस अनुसरतात, त्यामु ळेंच त्यांपासून पुष्कळ गोष्टी अनन्वित होतात.

---

## गोष्ट १५७

### पोपट आणि पिंजरा

एके मोठे मनुष्याकडे पोपट होता, त्यास त्याणें नित्य चांगले चांगले पदार्थ खायास घा लून एक मोठे मोलाचे पिंजर्‍यांत पाळिला हो ता. तो पिंजरा त्याणें बागांत एका झाडाखालीं संगमर्वरी दगडाचा चवथारा करून त्यावर ठेवि

ला होता; कीं, त्या पोपटानें उष्णकाळीं उघड्यावर वारा घेऊन सुख पावावें. तो घरधनी किंवा घरचीं माणसें त्या पोपटा जवळ आले, तेव्हां त्याशीं मधुर, लाडके शब्दांनीं भाषण करीत. त्याशीं [illegible] खेळत तों घरची यजमानीण आपला कोमळ हात त्यावर फिरवून मौजकरी. असे सदा सुखांत असतांहि तो पोपट नित्य मनांत झुरत असे कीं, देवा, दुसरे पक्षी अरण्यांत मोकळे राहून झाडांचे फांद्यांवरून स्वछंद वसतात; ते दैववान्. मी त्यां सारिखा मोकळा कधीं फिरूं लागेन. कोणे एके दिवशीं चाकराचे हातून पिंजऱ्याचें दार उघडें राहिलें, तो त्या पोपटास सवड सांपडली, आणि तो बाहेर निघून जवळचे अरण्यांत गेला. मनांत कीं, राहिलेलें आयुष्य तेथें सुखानें घालवीन. परंतु अरण्यांत जाऊन तो नाना प्रकारच्या नव्या नव्या अडचणींत मात्र पडला. बापुडा तो पूर्वी आपण दुःखी ह्मणून मनांत मानित मात्र होता; तो आतां खराच दुःखीझाला. दुसरे पक्षी त्यास चोंचीनें टोंचूं

लागले. त्याची मनुष्य वाणी, जी ऐकून लोकां
स संतोष होत असे, ती ऐकून, पक्षीजात त्या
स अधीक यातना करूं लागले. गोड गोड अन्न
खात असे, तें आतां नाहीं. उद्योग करून पोट
भरावें तर, त्याचा त्यास अभ्यास नाहीं ह्मणून उ
पाशीं मरूं लागला. वारा, पाऊस, यांचे उपद्र
वा पासून संरक्षण करणारें असें घर नाहींसें झा
लें. पावसानें पक्ष भिजावे, आणि थंडीनें कुड कु
डावें; याप्रमाणें, त्याची शरीर प्रकृती नाजूक ति
चा टिकाव निघत नाहींसा झाला. शेवटीं तो कष्टू
न कष्टून मरत्येवेळेस, आपणाशीं असें बोलिला:
आहा रे आपल्या पोपटा! जर पुनः एक वेळ पिं
जरा तुला प्राप्त जाला असता, तर तूं बाहेर फि
रायाची गोष्ट कधींही न करितास. परंतु तो
आतां कसा प्राप्त होतो? असें ह्मणून त्याणें डो
ळे मिटले.

तात्पर्य.

सर्व गोष्टी अनकूळ असतां, ज्यास स्वछंद पणें भटकायाची आसोशी, त्याणे या गोष्टी पासून ही शिक्षाघ्यावी: कीं, जर स्वतंत्रता विपत्तीसह वर्तमान आहे तर, ती काय कामाची? नावाड्या वांचून तारू समुद्रांत निभत नाहीं. सेनाधिपाचे स्वाधीन झाल्या वांचून सेनेचा परिणाम नाहीं. तसेंच, स्त्रिया, किंवा पोरें, ज्यांस स्वतां नि भायाची शक्ती नाहीं, त्यांणीं, आपण परतंत्र ह्मणून खेद कां करावा? आणि नसतीं दुःखें कल्पून आपणास संकटांत कां पाडावें?

———०※०———

गोष्ट १५८.

चिरपिट आणि इतर पक्षी

एक कुळवी शेतांत आंबाडी पेरित होता, तें चिरपिट पक्ष्याचें लक्षांत येऊन, तो इतर पक्ष्यांस ह्मणतो, रे, तुह्मी सर्व अनकुळ व्हाल तर, आ

पण हें बीं उकरून याचा नाश करूं; कां कीं, या अंबाडीचे दोर होतात; पारधी त्यांचीं जाळीं करितात; तीं, पक्ष्यांचे नाशास कारण होतात. तें, चिरपिटाचें भाषण, तेव्हां कोणी ही ऐकिलें नाहीं. नंतर त्या अंबाडीस अंकुर फुटले; तेव्हांहि त्याणें त्यांस सांगितलें; पाहा, आपण सर्व या शेतावर तुटून पडलों असतां, अजूनहि उपाय आहे. तें ऐकोन त्याचा सर्वांनी उपहास केला. ह्मणूंलागले, हा वेडा, आपणास पुढील भाकीत कळतें ह्मणून आह्मास भासवितो आहे काय? मग, आपलें सांगणें व्यर्थ गेलें पाहून, चिरपिटानें विचार केला कीं, असल्या अविचाऱ्यांचे संगतींत राहाणें यतःपर योग्य नव्हे. असें ह्मणून त्याणें, त्या दिवसा पासून पक्ष्यांचा सहवास सोडिला, आणि मनुष्यांत वस्ती धरिली.

तात्पर्य.

## तात्पर्य

आपण मनुष्य आहों ह्मणून, ज्यांत सर्व मनुष्य जातीचें हित होईल, तें करित असावें, हा आपला साहजीक धर्म होय. त्यांतही, आपले ओळखी, सुहृद, संबंधी यांचें कल्याण करणें हें अवश्यक होय. दुसरें कांहीं आपणा पासून होई ना तर, बरी बुद्धी तरी सांगावी. एक वेळ न ऐकिली तर दोनतीन वेळा आणिखी सांगून पाहावी; ह्मणजे आपणास उचित तें आपण केलें. त्या उपर जर तें फसणारच, तर सुखें फसोत; त्याचा आपणाकडे दोष नाहीं. मग असल्ये अविवेक्यांची संगत करून त्यांचे बरोबर आपण आपला नाश करावा त्यापेक्षां, त्यांचा संग सोडावा हें युक्त आहे. कां कीं, ते ऐकत नाहींत ह्मणून, त्यांस उपद्रव करणें हें जसें नीट नव्हे; तसें त्यांचे भिडेनें त्यांची संगत करून त्यांजबरोबर आपण बुडावें, हेंही युक्त नव्हे.

## गोष्ट १५९

### तरणा आणि माजर

कोणी एक तरणा पुरुष, एका माजरीशीं नित्य खेळत असे. ती बहुत सुंदर होती; तीजवर त्याची प्रीत फार जडली; ती इतकी कीं, तो शेवटीं तिजविषयीं सकाम होऊन त्याव्यथेनें रात्रदिवस झुरूं लागला. मग त्या दुःखाचे परिहारासाठीं त्याणें, रतीदेवीचें आराधन आरंभिलें. तेव्हां, देवीनें कृपाळू होऊन त्या माजरीची लावण्य स्त्री केली. तीस पाहून त्या तरण्याचा आनंद ब्रह्मांडांत माईना! त्याणें तिशीं त्याच दिवशीं लग्न केलें. रात्री दोघें निजायास खोलींत गेलीं तेव्हां, तिनें तेथें कोठें उंदराची चाहूर ऐकिली; ऐकतांच ती तत्क्षणीं नवऱ्यास सोडून उंदिरामागें लागली; तें पाहून रतीस क्रोध आला, कीं हा माझा सोहळा, ज्यास मोटमोटे मान देतात, त्याचा इणें अनादर केला! तस्मात् ही नीच आहे.

आहे. मी इला मनुष्य केली ती बाहेरून मात्र झाली; आंत ती मांजरच आहे. तर पुनः आतां, इची चाकरी आणि करणी, हीं परस्पर मिळत असें करावें. असें ह्मणोन तिनें तिला पुनः होती तशी केली.

### तात्पर्य

शिक्षा आणि संगती, हीं मनुष्याचे बरेवाईट रीतीस कारण होताहेत खरीं; परंतु मुख्यत्वें करून त्यास, त्याचा स्वभाव कारण आहे. स्वभाव मूळ चांगला आहे तर सद्गुणांची वृद्धी करितां येईल; परंतु तो केवळ सोडवून नवाच स्वभाव करणें हें अशक्य आहे. जो स्वभाव दरिद्री, त्याजवळ कोट्यावधि रुपयांची संपत्ती आहे, तर तो आपल्या सर्व व्यवहारांत दरिद्री चिन्हेंच दाखविल. प्रकृतीनें त्यास दरिद्र भोगायासाठीं उत्पन्न केला, त्यास भाग्यानें हात दिला तरी, ती प्रकृती तें भोगवीलच. प्रकृतीनें मूर्ख, त्यास संपत्ती शाहाणा क

रूं शकत नाहीं. प्रकृतीनें जो हलका, त्यास भा त्यामुळें लोक भजोत, परंतु ते। गुणानें थोर हो त नाहीं.

———०※०———

## गोष्ट २६०

### मधमाशा, द्रोणमाशा, आणि गंधल्ली.

किती एक द्रोणमाशा मधमाशांचे पोव्यांत ये ऊन ह्मणूं लागल्या कीं, ही मध आमची आहे. मग त्यांचिल्यांचें भांडण लागून, उभयतां गंधिल माशीपाशीं न्याय करावास गेल्या. तिणें सांगी तलें, जर तुह्मी न्यायाधिशीचे रितीनें वाद सांगा ल, तर तुह्मास खर्च पुष्कळ लागेल, आणि तोड ही लवकर होणार नाहीं; तर तुह्मी दोघेंही मा झीं मित्रें, मी तुमचें कल्याण इच्छितें; ह्मणून तुह्मा स सांगतें कीं, तुह्मी दोघें मिळून मला लवादी लिहूनद्या; ह्मणजे मी तुमचें मनास आणून नीत असेल ती सांगेन. त्या गोष्टीस दोघेही पक्ष रा

जी झाले. मग त्या गंधलीनें त्यांचा वाद मनास आणून सांगीतलें, ऐकतां; तुह्मी दोघेंही एक सारिखीं दिसतां, ह्मणून खऱ्याखोट्याचा निवाडा करणें मला अंमळ अवघड दिसतें. यासाठीं माश्यानों, तुह्मी असें करा कीं, एक रिकामें पोळें घ्या; आणि ड्रोणांनों, तुह्मीही एक घ्या; आणि त्यांत मध करून उभयतां, मजपाशीं आणा; ह्मणजे मी तुमचे मधीचा स्वाद, रंग, पाहून, या पोळ्यांतील मध कोणाचा तो सांगेन. मधमाश्या त्यास लागल्याच मान्य झाल्या; आणि ड्रोणमाश्या कांकूं करूं लागल्या; तें पाहून गंधलीनें ड्रोणांस सांगीतलें कीं, तुह्मी खोट्या आहां, आणि मधमाश्या खऱ्या आहेत.

## तात्पर्य

जे लबाड आहेत, ते आपली लबाडी ज्या गोष्टीत उघडी पडेल तेथें आढे पेढे फार घेऊन, वाद लांबऊन, भले मनुष्यास उगीच अशांत घालितात.

त. मनांत कीं, न्यायाधीशाची दृष्टी चुकून स
मयीं आपलें काम झालें तर झालें. आणि ज्या
चा पक्ष खरा आहे तो, कोणत्येही गोष्टीविषीं अ
डचण घालीत नाहीं.



## गोष्ट २६१

## चोर आणि कोंबडा

एका घरांत रात्रीं चोर शिरले; तेथें त्यांस चो
रायाजोगतें कांहीं सांपडलें नाहीं; एक कोंबडा
मात्र सांपडला. त्यास नेऊन मारूं लागले, ते स
मयीं, कोंबड्यानें त्यांची फार विनवणी केली कीं,
पहा! मी लोकांस किती उपयोगी आहें तो. मी
पहांटेस आरडून सर्वांस आपआपल्ये कामका
जीं लावितों. ह्मणून तुह्मी मला मारूं नये. चो
र ह्मणाले, बरें तुझा, ह्मणूनच आह्मी तुला मा
न कापणार, कीं, तूं ओरडून लोकांस सावध ठे

वितोस,

विनोस, तेणें करून आह्मास सुखानें चोरी करि तां येतनाहीं.

तात्पर्य

ज्या गुणानें भले लोक आपणास बरें ह्मणतात, तोच आपला गुण, दुष्ट लोकांचे तोंडीं दुर्गुण होतो.

—∞※∞—

गोष्ट १६२

बोका, ज्यास जेवावयास आंमतला होता.

एका गृहस्थानें एका थोर मनुष्यास जेवायास बोलाविलें होतें; त्यासाठीं मोठा समारंभ चालला होता; तें घरचे बोक्यानें पाहून, मनांत विचार केला कीं, मी चार दिवस माझे मित्रास जेवायास बोलाविणार, त्यास आजची ही सवड बरी आहे. मग त्यानेंहि आपले इष्टास आमंत्रण दिलें; त्यावरून तो तेथें आला, आणि प्रथम पाकशाळेंत गेला. तेथें नाना प्रकारचे पदार्थ रां

धित

थित होते, तें पाहून मनांत ह्मणतो, हें अन्न ये न्हवीं मला दुर्लभ; परंतु दैवाचे योगानें आज प्राप्त झालें आहे; तर आतां मी हें असें खाईन कीं, आठ दिवसांची निश्चिंती. असा मनोरथ करून शेंपटी हालवितो आहे, आणि लाळ घोंटितो आहे; इतक्यांत त्यास एके रांधप्यानें पाहिलें आणि तो हळूच त्याचेपाठीं लागून येऊन, त्याच्या मागील दोन तंगड्या धरून, त्यास खिडकी बाहेर झोकून दिलें. तेथें खालीं खडकाळ होतें, त्यावर आदळून डोक्याचें सर्वांग ठेंचलें; तो आरडत ओरडत तिरीतून पळूं लागला. तें पाहून दुसरीं लाजरें त्या जवळ आलीं; त्यांणीं त्यास विचारिलें, अहो, आपणास मेजवानीस बलाविलें होतें, तेथली काय समाचार आहे? तो ह्मणाला, तो समाचार काय वर्णूं! अशी मेजवानी जन्मांत मला झालीच नव्हती! पण झालें काय कीं, अंमळ कुसुंबा विशेष झाला, त्याचा मद चढून त्या घरांतून मी बाहेर कसा निघोन आलों, त्याची शुद्धि मला राहिली नाहीं.

### तात्पर्य

मुख्य यजमानाची ओळख असल्या वांचून, आणि त्याणें बोलाविल्या वांचून, नुसतें लग्नाचे विश्वासावर कोठें जाणें, तें बोक्यासारिखें विदास कारण होतें. तेथें अप्रतिष्ठा झालीती मग मोठ्या युक्तीनें छपवावयाची पडत्ये.

———०❁०———

## गोष्ट १६२

### धनगर व्यापारी झाला होता

एक धणगर, एके दिवशीं, समुद्राचे कांठीं, मेंढ्या चारणीस लावून, आपण एका धोंडीवर, शीतळ आणि मंद वारा खात, बसला होता. त्या समयीं निवांत होतें; त्यामुळें समुद्राचें पाणी निश्चळ झालें होतें. तें पाहून त्यास संतोष होऊन मनोरथ उत्पन्न झाले कीं, आपण व्यापारी व्हावें. ह्मणाला अहो, जो मी मेंढ्या चारीत एथें रिकामा बसतों, तो एक धडशी नौका विकत घेऊन स

मुद्र खेडीन तर, किती सुखी होईन! दूर देशीं माल नेला असतां मला किती लाभ होईल! धन आणि थोरवी मिळायास ही वाट किती सुलभ आहे! अशा कल्पना करून, हाटीं जाऊन, त्याणें आपल्या सर्व मेंढ्या ओपिल्या; दुसरें हि होतें नव्हतें तें सर्व विकून, त्याणें एक नौका घेतली. त्यांत माल व नावाडी मनुष्यें घेऊन हां कारून अमळ नाट गेला, तों वादळास आरंभ झाला; मोठ मोठ्या लाटा उचलूं लागल्या; दिशा खायास येऊं लागल्या; तारूं बुडूं लागलें. मग भार हलका करावा ह्मणून त्याणें आंतील माल सगळा पाण्यांत टाकिला. तें करितांच, तारूं वाऱ्यानें हांटलें तें एका खडकावर आपटून त्याच्या चिंध्याचिंध्या झाल्या; नावाडी सर्व बुडाले; तो मात्र बुडतां बुडतां मोठ्या संकटानें तडीस लागला. नंतर त्याणें ज्यास मेंढ्या विकिल्या होत्या त्याजवळ तो चाकर राहायास गेला; त्याणें त्यास त्याच मेंढ्या राखायास ठेविलें. तेव्हां पुनः

एके

एके दिवशीं तो समुद्र कांठीं धोंडीवर बसला आहे तों, समुद्रास निश्चळ पाहून ह्मणतो, अरे उका, आतां दुसऱ्यानें तूं मला लालचावास पाहातोस, तो तुझा प्रयत्न व्यर्थ आहे. ऐसी तुला पाहून मागतो भुलावें तर, फार दरिद्री आहें. आणि एकवेळ अनुभव घेतला त्याणें मला शाहाणें केलें, ह्मणोन मी आतां तुझा विश्वास धरणार नाहीं.

तात्पर्य

विकतें शाहाणपण चांगलें अशी ह्मण आहे. यासाठीं जो पुरुष, एकदां सर्व दुःख कष्ट सोसून व सुखाचा अनुभव घेऊन थंड झाला, तो मग आपल्या अवस्थेंत संतुष्ट राहातो, सोडून अन्य इच्छित नाहीं.

---

गोष्ट १६४

तरणा आणि सिंहाचें चित्र

एक ह्मातारा कोट्याधीश होता, त्यास एकचा एकच मुलगा; त्यावर त्याची अत्यंत ममता असे.

त्या मुलास पारधीचें व्यसन लागलें; तें पाहून, देवा, माझ्या लेंकाची गत कशी होईल! ह्मणून ह्या त्तरा नित्य काळजी वाहूं लागला. एके रात्रीं त्यास स्वप्न पडलें कीं, अरण्या मध्यें लेंकास सिंहा नें फाडून खाल्लें; तें न जाणों खरें होईल, या भ याने, ह्मातार्‍यानें एक मोटा वाडा बांधून त्यास भों वताला कोट करून त्यांत मुलास अडकवून ठे विलें. त्या वाड्यांत मुलाचें चित्त रमायासाठीं त्यागें सर्व प्रकार अनकूळ केले. नाना प्रकार चीं चित्रें चितरविलीं. आणि जींजीं सावजें मुला चे आवडीचीं होतीं त्यांचीं चित्रें भिंतीवर टांगवि लीं. त्यांमध्यें एक सिंहाचें ही चित्र होतें. एके दिवशीं तें सिंहाचेंचित्र पाहून मुलास फार क्रो ध आला कीं, स्वप्न खरें होईल असें मानून बा पानें मला कोंडून ठेविलें आहे, तें या दुष्टा सिं हाकरितां. मग तो डोळे वटारून त्या चित्रा स ह्मणतो, रे दुष्टा, मीं हें बंदिशाळेचें दुःख भो गतों हें तुझेमुळें. मज जवळ या समयीं तरवा

र असती तर तुझे उरांत भोसकतों, पण काय करूं रे! असें बोलून दांतओंठ खाऊन आवेशानें त्याणें त्या चित्रांतील सिंहाचे उरांत बुक्की मारिली. तेथें त्यांत भिंतीस एक खिळा होता, तो हातास रुतोन घाय झाला; तो विकोपास जाऊन मुलगा त्या दुखण्यानेंच मरण पावला. याप्रमाणें बापानें जो स्वप्न खोटें करायास उपाय केला, तो व्यर्थ जाऊन होणार तें झालेंच.

तात्पर्य.

होणार भविष्य चुकत नाहीं, मग उगीच काळजि वाहून जिवास खटपटींत कां पाडावें?

---

गोष्ट १९५
कोंबडी आणि कोल्हा.

एक कोल्हा, एका खोपटींत शिरून कांहीं भक्षायास मिळावें ह्मणून खालीं वर पाहात होता, त्यांनें तेथें एक कोंबडी पाहिली, ती माळ्यावर उंच

बसली

बसली होती, तिजपाशीं त्यास जाववेना तेव्हां तो तिची प्रशंसा करून ह्मणतो, ताई, तुझा कायगे समाचार आहे? तुला फार बरें वाटत नाहीं, घरांतच निजून असल्येस असें मी ऐकिलें, तेव्हां पासून ताई मी तुला खरेंच सांगतों, मला असें दुःख झालें आहे, कीं रात्र दिवस झोंप लागत नाहीं. तर गद्ये खरेंच सांग मला, तूं आतां कशीगे आहेस? आरती तरि ये, मला तुझी नाड पाऊंदे. असा तो बोलतो आहे, मध्यें मध्यें तिला नावाजतो आहे, त्यास खोळंबवून, बसली होती तेथूनच, कांबडी उत्तर करिते; खरेंचरे, भाऊ, त्वां ऐकिलें तें खरेंच. असें दुखणें मला कधींही आलें नव्हतें. मी आतां खालीं तुजकडे आल्ये असत्यें, पण वैद्यानें मला सांगितलें आहे कीं, तूं कोणास जवळ येऊं देऊं नको; आणि कोणा जवळ जाऊं नको. ह्मणून रे भाऊ मला खालीं येववत नाहीं. आतां तूं या वेळेस जा. सध्या मी अशक्त इतकी आहें कीं, तुझे जवळ चालून आल्यें असतां माझा प्राण निघून जाईल.

### तात्पर्य

प्रशंसक मात्र जितका, तितका लबाड, सर्वांचा शत्रु, असें समजून सर्वांनी त्याशीं तजीज वर्तणूक करावी. कांकीं त्याचे काव्याची भाषणाचे पार दृष्ट पोहंचवून त्याचे पाशांत सांपडणार नाहींत असे चतुर पुरुष या लोकांत विरळा, फसणारे असे फार.

——०※०——

### गोष्ट १६६

### बेडूक आणि उंदीर

एके समयीं उंदिराचें, आणि बेडकाचें, एका नदी कडाचें धनीपणा करितां भांडण लागलें. उंदीर धूर्त, तो गवता आड राहून बेडकावर घाले घाली; बेडूक उड्या मारण्यांत निपूण, त्यानें पाहून युक्तीनें उंदिराशीं गांठ घातिली; आणि त्यास ह्मणाला, पुरुषा, कशा समोर हात झोंबीस

चे, चोरा सारिखा लपोन कां मारतोस? मग ते एकमेकाचीं उणी काढून हातांत वाय पातें घेऊ न युद्धास उभे ठाकले; आणि आतां एकामेकांचा जीव घेणार, इतक्यांत एक घार येऊन तिणें त्या दोघांसही उचलून नेलें.

तात्पर्य

ह्मण आहे, दोघांचें भांडण आणि तिसऱ्यास ला भ. तिचें कारण, कीं मनुष्य एकमेकाचा द्वेष करूं लागले ह्मणजे परस्परांचीं वर्में कर्में काढिता त; ते द्वेषाचे भरांत जाणत नाहीं कीं, तिसरा कोणी आपणावर अटकळ बांधून आपल्ये नाशा च्ये योजनेंत असेल. बऱ्याच ठिकाणी असें आढ ळतें कीं ज्या वस्तूच्या निमित्तानें भांडतात, त्यांत कांहीं जीव नसतो. अमुकास अमुक्यानें हारवि लें इतक्या अभिमानासाठींच त्यांचें तें जीव देणें आणि घेणें, मग असे आहत त्यांच्ये भांडणाचा परिणाम प्राणास मुकणें, पराधीनपणा, आणि दुः ख प्राप्ती.

गोष्ट १६७

मुंगुस आणि मनुष्य

एक मनुष्य मुंगुसास धरून त्याचा जीव घेत होता, तेसमयीं त्या मुंगुसानें त्याची दीन वाणीनें प्रार्थना केली; बाबा, मला मारूं नको. मी तुझा उपयोगी आहें. पाहा कीं, मजमुळें तुझे घरां त उंदिरांचा उपद्रव नाहीं. मनुष्य ह्मणाला खरी गोष्ट, तूं जर तें काम माझे ममतेनें करिता स, तर मी यासमयीं तुला जीवदान देऊन, तुझा मोटा उपकार मानितों; परंतु उंदिर माझ्या खाया पियाच्या वस्तू राऊं देत नव्हते, तो उप द्रव मला अद्यापि तुजपासूनही तसाच आहे; यासाठीं तुझा तो उपयोगी पडण्याचा आभार दु सरे कोणाकडे लाव, मजकडे लावूं नको. अ सें बोलून त्याणें त्याचा प्राण घेतला.

तात्पर्य

तात्पर्य

जें आपण आपल्ये स्वार्था करितां केलें, त्यापा सून यद्यपि दुसऱ्यास उपयोग झाला, तथापि तो त्यावर उपकार असें ह्मणतां येतनाहीं.

—∞✻∞—

गोष्ट १६८

सेवक आणि कोडगा

कोणीएक चाकराचा धनी, दिवसा उजेडीं घरीं आला, त्याणें लवकर जेवायास कर ह्मणोन, चा करास आज्ञाकेली; तेसमयीं घरांत विस्तव नव्ह ता, त्यासाठीं तो चाकर शेजार घरांतून वात ला ऊन घेऊन, मोठे त्वरेनें माघारा येतहोता. त्यास वाटेंत एक कोडगे मनुष्यानें हातीं धरून उभा केला, आणि पुसतो; अरे, एवढे वेळेस तुला दि व्याचें काम काय बरें आहे? हा तूं कोणासाठीं,

कोडें

कोठें नेतो आहेस तें मला सांगशील? चाकर उत्तर करितो; रे मी यांस ज्यानें शहाणें मनुष्यास शोधितों आहें, तो मला अजून सांपडत नाहीं. तें ऐकून कोडगा लाजला आणि चालता झाला.

तात्पर्य

ज्याचें चित्त उद्योगांत अथवा विचारांत आहे, त्यास असमयोक भाषण करून खिजवणें, हें कोडग्याचें लक्षण होय. असे पुरुषास व्यग्र आहेत ते मनुष्यांत गणित नाहींत.

---

गोष्ट १६९

कोल्हा आणि साळू

एक कोल्हा नदी उतरून पैलथडी जवळ आला, तेथें कडा तुटला होता, त्यामुळें त्याच्यानें वर चढवेना, ह्मणोन तो तेथेंच इकडे तिकडे चांचपून वर चढायाचा मार्ग पाहात होता, तों त्याचे

माथ्यावर

माथ्यावर एक माशांचा थवा येऊन बसला, आ णि त्याचें रक्त पिऊं लागला. तेथें बरलेकडे, एक साळू होती, ती त्यास ह्मणत्ये, गड्या, मला सांगशील तर, या माशा मी हांकलून टाकित्यें. तीस तो उत्तर करितो; बाइगे, मी तुझा मोठा आभारी झालों, परंतु मला तें नको. कांकीं, या माशा आतां रक्त पिऊन तृप्त झाल्या, ह्मण जे फार उपद्रव करणार नाहींत. आणि यांस जर तूं उडविशील तर, दुसरे क्षणीं दुसरा बुभु क्षित माशांचा थवा येऊन येथें बसेल, आणि मा झे आंगीं एकही रक्ताचा बिंदु ठेवणार नाहीं.

तात्पर्य

राजाजवळचे कितीएक कारभारी खादू अस तात, ह्मणून जर आपण त्यांस दूर करण्याचा य त्न केला, तर त्यांत फळ नाहीं. त्याचे ठिकाणी दुसरे येतील तेही तसेंच काम करितील; ह्मणून जे आहेत तेच बरे: ते कांहीं दिवसांनीं तृप्त झा ल्यावर, त्यांपासून, दुसरे, केवळ नवे; येतील त्यां सारिखा तीक्ष्ण उपद्रव होणार नाहीं.

गोष्ट १७०

रानकावळा आणि साप

एके रानकावळ्यानें एके समयीं सापास चोंचीत धरिलें; आणि त्यास खाणार, इतक्यांत सापानेंही तडफडत तडफडत त्याचे मानेस चावा घेतला; तेणेंकरून तो कावळा विखारून प्राण सोडितेसमयीं बोलतो; अहो, मी दुसऱ्याचा नाश करून सुख भोगणार होतों; त्यामला हें प्रायश्चित्य नीटच झालें.

तात्पर्य

परपीडा करणाराचा कधीनाकधीं नाश होईलच; ज्यांचा हा दृढनिश्चयच कीं, आपला स्वार्थ साधत असतां दुसऱ्यास कितीही दुःख होऊ, तें मनास आणूं नये, त्याचें कल्याण कसें व्हावें.

## गोष्ट १७१

### ब्रह्मदेव आणि उंट

एकेसमयीं उंटानें ब्रह्मदेवाची फार काकळुतीनें प्रार्थना केली; देवा, जशीं बैल आदिकरून सर्व पशूंस आपण शिंगें दिल्हीं आहेत, तशीं मला कां बरें द्याना? कीं जेणेंकरून मी शत्रूपासून आपलें संरक्षण करीन; आणि ह्मणोंलागला, देवा ही एवढी माझी विनंती ऐकावीच. त्यास ब्रह्मदेव बोलला, रे मूर्खा, तुला दिलें आहे तें मीं विचार करूनच दिलें आहे; त्यांत तूं संतुष्ट असावेंस, तें नसोन, मी दुसऱ्यास दिलें आहे तें पुढें करून तसें मागतोस; त्यास तुला या तुझ्या धकृपणाचें पारिपत्य इतकेंच करितों, कीं तुझे कान जे लांब आहेत ते तोकडे होतील. आणि तूं आजपासून काबाड वाहाशील.

### तात्पर्य

या विश्वामध्यें भगवंतानें ज्यास जें नेमून दिलें आहे, तें नीट आहे. तें अन्यथा करावें ह्म

णोन

लोन जे उद्योग करितात, ते अल्प दृष्टी, वेडे म्ह णावे. अशांचा उद्योगच व्यर्थ जातो असें नाहीं, तो व्यर्थ जाऊन ते उलटे दुःखी होतात.



गोष्ट १७२

लावीपक्षिण आणि तीचीं पिलीं

एक लावीपक्षिण शेतांत राहात होती. तें शे त पिकलें असतां तीस काळजी पडली कीं, मा झीं पिलीं पांख फुटोन चांगलीं उडायास लागा याचे अगोधर, जर शेतकरी शेत कापायास आ ला, तर कसें होईल? मग ती नित्य बाहेर चा रा आणायास जाई तेवेळीं पिल्यांस सांगे कीं, माझे मागें कोणी काय बोलेल तितकें सर्व मी घ रीं आल्यें ह्मणजे मला सांगावें. एके दिवशीं शे ताचा धनी शेतावर येऊन आपल्ये मुलास ह्मण तो, मुला, मला वाटतें कीं हें शेत आतां का

धायास झालें; त्यास तूं उद्यां सकाळीं जा, आणि आपले इष्टमित्र शेजारी यांस शेत कापणीस हात लावावया विनंतीं प्रार्थः असें तो शेतकरी मुलास बोलिला तें पिल्यांनीं आई घरीं येतांच तीस सांगीतलें; आणि तिचे भोंवतीं किलकिल करून ह्मणू लागलीं, आई, आतां तूं आह्मास लवकर घेऊन दुसरेकडे ने. आई ह्मणाली मुलांनों, स्वस्थ असा; कांकीं, शेताचे धन्यानें शेत कापायाविषयींचा भरंवसा शेजारी आणि इष्टमित्र यांवर धरिला आहे, त्या वरून मी पक्कें जाणत्यें कीं उद्यां कापणी होतनाहीं. दुसरे दिवशीं त्यावी बाहेर जाऊं लागली, ते समयीं तीणें मुलांस पूर्ववत् सांगून ठेविलें; त्या वरून तीं शेताचा धनी काय बोलतो तें ऐकायास टपत बसलीं होतीं; तो शेतावर येऊन बोलाविले होते त्यांची वाट पाहात बसला; परंतु कोणी आलें नाहीं, आणि जवहीं झालें, तेव्हां तो लेकास ह्मणतो, अरे, इष्ट मित्र शेजारी यांवर विश्वास ठेवणें काहीं कामाचें नव्हे; तर तूं आतां असें कर

कीं,

कीं, आपल्या शेजाऱ्यांस प्रार्थून त्यांस सांग, कीं म
ज करितां तुह्मीं सुप्रभात अगत्य येऊन कापणी
स साह्य व्हावें. तें ऐकोन पिलीं फार भ्यालीं,
आणि आयी येतांच त्यांणीं तें वर्तमान तीस सां
गीतलें. तेव्हां ती ह्मणाली मुलांहो, इतकेंच ज
र आहे तर भिऊं नका; कांकीं, शेजारीं शेजाऱ्या
ची तीडीक धरून त्याचे कामीं पडतील हें मिथ्या.
परंतु उद्यां फिरून तो काय बोलेल तें चित्त दे
ऊन ऐका, आणि मला सांगा. दुसरे दिवशीं
शेताचा धनी येऊन फार वेळ शेजारी येणार ह्मण
न वाट पाहात बसला, परंतु ते आले नाहीं; तें
व्हां तो मुलास ह्मणतो; कांहीं चिंता नाहीं, भिव्यां,
तूं उद्यां सकाळला दोन बराव्या चांगल्या धाज
वून ठेव, आपली आपणच कापणी करूं. हें व
र्तमान पिल्यांनीं आयीस सांगतांच, ती ह्मणाली
मुलांनो, आतां येथें राहून आपला परिणाम ना
हीं; कांकीं, जो मनुष्य आपलें काम आपण स्व
तां करायास निघाला, तो खचीत करून तें शेव

टास

ठास नेईल. मग तिनें आपलीं पिलीं तेथून त
त्क्षणीं काढून दुसरे ठायीं नेलीं. दुसरे दिवशीं, शे
तकरी आणि त्याचा मूल, दोघे घेऊन त्यांणीं शेता
ची कापणी केली.

### तात्पर्य

जें काम आपण स्वतः करायास शकतों, त्या
विषयींचा भरंवसा, सोयरीं अथवा इष्ट मित्र, यां
वर धरूंनये. जो पुरुष त्यांचा भरंवसा धरितो,
त्याचे दोन तोटे होतात: एक, मुर्खा सारिखें त्यां
ची वाट पाहात कुचंबुन राहाणें; दुसरा, त्याणीं
फसविलें ह्मणून महान् संताप पावणें. याक
रितां जो आपल्ये कामाचा, मुख्यत्वें करून आ
पणावर भरंवसा ठेवितो, त्याचें काम घडूनयेतें;
आणि कदाचित् फसलेंच तर, त्याला आपल्ये म
नाचें समाधान करतां येतें, कीं मीं आपल्ये क
डून उद्योग करण्यांस आळस केलानाहीं: को
णाचे भरंवशांवर राहिलो नाहीं: असें असतां
झालेंनाहीं, त्याचा शब्द मजकडे काय?

गोष्ट

## गोष्ट १७३

### डोमकावळा आणि मेंढा

एक डोमकावळा, एका मेंढ्याचे पाठीवर काकावत बसला, त्यास मेंढा ह्मणतो, रे, दुःख दायका, उगाच कां राहीनास? गोंगाट कां करितोस? रे, जरमीं वाघ असतों; अथवा, कुत्रा असतों; तर तूं मला असा उपद्रव करूंशकतास? डोमकावळा ह्मणतो रे, खरी गोष्ट सांगीतलीस. मीं तें जाणूनच वर्ततों. जे उग्र आहेत; जे मला प्रतिकार करायास शकतात; त्यांचे वाद्यासही मीं उभा राहत नाहीं. जे तुज सारिखे अनाथ, दीन; आहेत, ज्यांपासोन मला भयनाहीं, त्यांसच मीं उपद्रव करितों.

### तात्पर्य

बहूत करून लोकांचा या डोमकावळ्या सारिखा स्वभावअसतो, कीं जे अपकारास अपकार करूंशकतात, त्यांचे वाटेस जातनाहींत; आणि

जे

जे अनाथ, जे दुर्बळ, त्यांस पीडा करून मनांत समाधान पावतात. त्यांची समजूत इतकीच कीं, जेथें पीडा केल्यास आपलें पारिपत्य होणार नाहीं, तेथें करावी, जेथें होईल तेथें करूं नये.

---

## गोष्ट १७४

## कुळंबी आणि दैव

कोणे एका कुळंब्यानें शेतांत नांगर लावला होता, त्याचे फाळास द्रव्याचा हांडा लागला. तो पाहून कुळंब्यास फार हर्ष झाला; डोळ्यांत आनंदाश्रु आले. तेसमयीं तो त्या शेतास ह्मणतो, बाप्पा, मी तुझा फार उपकारी झालों. तूं मजवर ही मोठी कृपा केलीस. तें ऐकोन दैवास राग आला; तें मनुष्य रूपानें कुळंब्या पुढें येऊन बोलूं लागलें, रे मूर्खा, तुला काय ह्मणावें! तूं मला सोडून शेताचा उपकार मानितोस; मा-

मी कारणहि केलें नाहिंस! रे, वेड्या, हें सांपड
लें इतकें द्रव्य तुझें नाहिसें झालें असतें तर, हा
च तूं, माझे नांवीं, रडत बसला असतास; तेसम
यीं तूं दुसऱ्या कोणास शब्द लावतासना.

तात्पर्य

ऐकादे कामकाजांत आपलें बरें झालें अस
तां त्यास आठवावा, ज्यास, आपलें वाईट झा
लें असतां शब्द लावू.

---

गोष्ट १७५

कोंबडा आणि कोल्हा

एके दिवशीं प्रातःकाळीं एक कोल्हा, एका वा
ड्यावर दोरीचे फांसांत सांपडला होता. तें एका
कोंबड्यानें दुरून पाहून, तो हळूच त्याजवळ ये
ऊन त्याचे तोंडाकडे पाहूं लागला. त्यास कोल्हा
ह्मणतो, भाऊ, पाहिलेंसना, मी काय संकटांत प
डलों तो! आणि हें सर्व थारे तुज करितां. का

कीं

कीं मीं, घरीं जात होतों, इतक्यांत तुझा शब्द कानीं आला, आणि मला असें झालें किं तुला केव्हां पाहीन, ह्मणून घाईनें येत होतों तें असें झालें. आतां तूं असेंकर कीं एक सुरी आण, आणि ही दोरी काप. मी तुझ्यानें नहोई तर, हें माझें वर्तमान तरी कोणाकडे सांगूं नको; जव मीच ही दोरी आपल्ये दांतांनीं कुरतुडून टाकीं, आणि सुटूनजाईं. कोंबड्यानें तें कूत्रिम समजोन त्यास कांहीं उत्तर दिलें नाहीं, आणि लवकर जाऊन पहिल्यानें वाडकरास तें वर्तमान सांगीतलें. तो धांवत आला, आणी कोल्हा दोरी कुरतुडतो आहे, तों त्याणें त्याचें पारिपत्य केलें.

## तात्पर्य

दुष्टावर उपकार करूंनये. ह्मणालकिं कोणाचेहि संकटीं कामासपडावें, अशीनीति आहे, तर, त्यावरून चोरासही साह्य व्हावें; असें होऊं लागेल; तर तें नाहीं; दुष्टाचें साह्य दुष्टानींच, आणीं चोरांचें चोरांनींच करावें, इतरांस काम नाहीं.

## गोष्ट १७६

## रिकामा घोडा आणि लादेला गाढव

एक रिकामा घोडा, आणि एक भारानें चेपलेला गाढव, हे दोघे मार्गें चालत होते; त्यां मागून त्यांचा धनीहि त्यांस हाकीत चालला होता. तेसमयीं गाढवास ओझें भारी झालें, आणि तो भेडें टेंकायाचे लागास आला. तेव्हेळीं त्यानें घोड्याची बहुतांपरी विनवणी केली, कीं दादा, माझे पाठीवरील ओझें तरी थोडें घेऊन मला साहाय हो; पाहा मी प्राण संकटांत आहे. घोडा निर्दय, अदय, त्यानें तें ऐकिलें नाहीं. पुढें तो गाढव धपके वाटेंतच ठेंच लागून खालीं पडला, तो उठेना, तेसमयीं त्याचें धन्यानें त्याचा तंग ढिल केला; आणि दुसरेहि डीगडीग उपाय केले; परंतु तो मेलास त्यानें कसें उठावें? मग धन्यानें त्यावरील ओझें व त्याचें कातडें काढून घेतलें, आणि घोड्याचे पाठीवर लादिलें. याप्र

माणें

म्हणें त्या घोड्यानें थोडा उपकार न करून त्या धण्यास मोठें अनर्थांत पाडिलें.

### तात्पर्य

आपण एका मेकाचे उपयोगी न पडलों तर, त्यांत उभयत्रही तोटा आहे. बारीक दृष्टीनें पाहातां एकमेकास एकमेक साहित्य करिताहेत म्हणूनच सृष्टीचा व्यवहार चालतो. यासाठीं ही गोष्ट जेथे जेथें होत नाहीं, तेथें सर्वांचाही कार्य बुडतो.

---

## गोष्ट १७७

### कोल्हा आणि लांडगा

एक लांडगा गुहेमध्यें खाण्याची सामग्री भरून स्वस्थ राहिला होता; तें अटकळून एक कोल्हा त्याचे भेटीस गेला; मनांत कीं, काय आहे तें त्या

पण प्रत्यक्ष लक्षांत आणावें. लांडग्यानें त्यास गुहें आंतूनच सांगितलें, बाबा, क्षमाकरून या वेळेस जा; माझे शरीरिं समाधान नाहीं. कोल्हा धूर्त, त्यास पूर्वीं संशय होताच तो तेसमयीं खरा झाला. मग तसाच तो एक्या मेंढरें राख्या पाशीं गेला, आणि त्यास तें वर्तमान सांगून ह्मणतो, कीं दुसरें कांहीं नको, एक दंडगा मात्र घेऊन चल, आणि लांडगा गुहेंत निजला आहे त्याचे तो कपाळावर मार, ह्मणजे तुझें काम झालें. मग तसें करून मेंढे राख्यानें त्या लांडग्याचा प्राण घेतला. नंतर तो दुष्ट कोल्हा त्या गुहेंत राहून लांडग्याचे जोडलेलें आपण भोगूं लागला. त्यास फार दिवस गेले नाहीं तों, तोच मेंढरेंराख्या एकेदिवशीं त्या वाटेनें जातहोता, त्यानें कोल्हा व त्या गुहेंत पाहून त्याचाही कपाळ मोक्ष केला.

तात्पर्य

अन्यायानें जो दुसऱ्याचा घात करून वैभव जोडितो, तो तें फार दिवस भोगित नाहीं.

गोष्ट

## गोष्ट १७८

## हरिण आणि द्राक्षी

एका हरिणा मागें पारधी लागले, तेव्हां तो पळ तपळत एका द्राक्षी आड झाला, तो दृष्टी पडेना; तेव्हां पारधी निराश होऊन मागें फिरले असतां, तो त्या वेलीचींच पानें खाऊं लागला, तेणेंकरून ती हालूं लागली; इतक्यांत त्या पारध्यांतून एकानें मागें पाहिलें; आणि त्यास वाटलें कीं, कोणी सावज वेलींत आडझालें आहे; ह्मणोन त्याणें अटकळीनें एक बाण टाकिला, तो हरिणास लागून त्याचा प्राण गेला. मरत्येसमयीं तो आपल्याशीं ह्मणतो, रे कृतघ्नास मला हें पारिपत्य योग्य झालें; माझे संकटसमयीं जी मला कामास आली, त्या वेलीसच मीं कसा उपद्रव करावा?

### तात्पर्य

कृतघ्नता ही सर्व दोषांचा राजा आहे. जो आपल्ये हितकर्त्यास उपद्रव करितो, तो पुरुष इतर

जनांस

जनांस उपद्रव करण्याविषीं मागेंपुढें कशास पाहील? यासाटीं कतघ्नाला ह्मणजे त्याचे दुष्ट पणाची शिक्षा झाली.

---

## गोष्ट १७९

## घार आणी कुळंबी

एक घार, एका खबूतराचे पाटीस लागली होती तीं, कुळंब्यानें कबडे धरायास जाळें घातलें होतें, त्यांत सांपडली; तेवेळीं ती पाखें फडफडावित्ये आहे, आणि सुटोन जाण्याविषीं यत्न करित्ये आहे, तों तो कुळंबी जवळच काम करीत होता, त्याणें येऊन तीस धरिलें, आणि मारूं लागला. तेव्हां ती काकुळतीस येऊन त्यास विनंती करित्ये कीं, मला जीवदान दे, पाहा! मज पासून तुला काहीं उपद्रव झाला नाहीं; मी खबूतरामागें लागल्यें हो त्यें. तीस कुळंबी उत्तर करितो, बरें तर, खबूतरानें तरी तुझा काय अन्याय केला होता. असें ह्मणून त्याणें तीचें शीर आणी धड त्याक्षणी वेगळें केलें.

तात्पर्य

तात्पर्य

पर पीडा करणें हाच मुळीं दोष, मग तो थोरास किंवा धाकट्यास करो, तीची व्यथा दोघांस ही सारिखी, तेणेंकरून दोषी होणें हें चुकत नाहीं.

——*——

गोष्ट १८०

वांनरी आणि तिचीं दोन पोरें

एक वांनरीस दोन पोरें होतीं, त्यांतून एका वर ती फार प्रीत करी, आणि दुसऱ्याची अनास्था करी. एके दिवशीं, तिच्या मागें पारधी लागले आहेत, असे समयीं, तिणें आवडत्ये पोराचे सा ळीकरितां, त्यास उराशिं धरिलें; तेव्हां दुसरें होतें तें सहजच तिचे पाठीस वळघलें. याप्रमा णें पोरांस घेऊन ती वेगानें पळत्ये आहे, तों प्रा रब्ध योगानें असें जाहालें कीं, एका दगडीस आ वडत्ये पोराचें डोकें आपटून तें मृत्युपावलें; आणि पाठीवरलें संकटांतून वांचलें.

तात्पर्य

## तात्पर्य

आपण ज्यांचे लाड करितों, तीं मुलें बिघडतात; तीं आपल्यास व आपल्ये आईबापांस सुखदायक होतनाहिंत; आणि आपण ज्यांचे लाड करितनाहीं, तींच बहुतकरून दैववान् निपजतात.

---

## गोष्ट १८१

## काळा मनुष्य

गोरे लोकांचे देशीं, एकानें एके काळे मनुष्यास विकत घेतलें, त्यास पाहून त्या पुरुषाचे मनांत असें आलें कीं, हें ज्या जवळ होतें त्याचे अनास्थेमुळें याचे आंगावर मळी चढली आहे, ही धुवून काढली असतां, हें गोरें होईल. असें मनांत आणून त्याणें त्यास एके काथवटींत बसविलें, आणि मोटा खर्च करून, साबण, पापडखार, वज्या, आणि मोलकरी माणसें, आणविलीं.

एक मनुष्य त्याचे आंगास खार व साबण लावायास लागले; दुसऱ्यानें त्याचे डोईवर जळधारा धरिली; आणि एकदोघे वस्त्रीनें आंग घांसू लागले. असें सकाळ पासून सांज पर्यंत त्यांणीं वारंवार केलें, तें व्यर्थ जाऊन, माणसें मात्र शिणलीं; आणि तें काळें मनुष्य थंडीनें आंकडून मरण पावलें.

### तात्पर्य

जें जेथून व्हायाचें नाहिं, तें व्हावें ह्मणून कुतर्क घेऊन उगीच जो श्रम करित बसतो, तो नूस कांडून हातास फोडमाच आणितो.

—∞❊∞—

### गोष्ट १८२

### कोल्हा आणि दुखणाइत सिंह

एके समयीं सिंहानें खोटीच आवाई घातली कीं, आपण दुःखणें करी आहें, तर या समयीं जीं सांवजें माझे समाचारास येतील, तीं माझीं सर्वीं

ह्मणून समजेन. त्यावरून सर्व पशू सिंहाचे गु
हेस गेले. त्यांत कोल्हा आला नाहीं, तें लक्षांत
आणून, सिंहानें लांडग्यास हळूच शोधास पाठवि
लें; तो जाऊन कोल्ह्यास ह्मणाला, बाबा, तूं अ
सा निष्ठुर कसारे झालास? रे सर्व पशू स्वामी
चे समाचारास गेले, आणि तुझ्यानें राहावलें त
री कसें! कोल्हा ह्मणाला, दादा, सिंहोबास मा
झा साष्टांग नमस्कार सांगून विनंती करा कीं,
माझी प्रीति तुह्मांवर पूर्वीं होती तशीच आहे, त्या
विषयीं तुह्मी मनांत काडीमात्र संशय आणूंनका;
आणि मीं आतां हि, पायांवर डोकी ठेवायास ये
तों, परंतु काय करूं? तुमची गुहा माझे दृष्टीस प
डली ह्मणजे माझें पोटांत फाळच पडतो; का
रण कीं, जे तीन एकवेळ गेले आहेत, त्यांचीं पा
उलें अद्यापि माघारीं लागलीं नाहींत.

तात्पर्य

जी जी गोष्ट पुढें आली, तीचा विचार केल्या
वांचून तींत पडल्यास हाणी आहे. बजतांची या

ट ती आपली वाट, असें ह्मणून जर एकादे ख
टल्यांत गिरावें, तर असें आहे कीं, बहुत करू
न जन हे स्वबुद्धीनें चालत नसतात. त्यामध्यें एक
दुसरा कोणी स्वार्थ साधक असतो तो त्यांस वळि
वतो तसे ते वळतात. यासाठीं बहुत करतात त
सेंच केवळ करावें असें नाहीं; त्यांत आपणही
सारासार पाहावें.

---

गोष्ट १८३

मद्यपी नवरा

एके बायकोचा नवरा मोटा मद्यपी होता; त्या
चें तें व्यसन सुटावें ह्मणोन तिणें पुष्कळ प्रयत्न
केले, ते सर्व फुकट गेले, तेव्हां शेवटीं, तीणें ही
युक्ती योजिली: एके राचीस नित्या प्रमाणें तो न
वरा मद्यपिऊन बिदींत निचेष्ट पडला होता,
त्यास तेथून नेऊन तिणें मसणांत एका घड्यांत
निजविला, असा कोणी ह्मणेल मेला खराच, आ
णि आपण घरास आली, कांहींका वेळानें, तो

शुद्धिवर

मुढ्यांवर येऊन पश्चात्ताप पावला असेल, असें म
नांत आणून, पुनः ती स्मशानांत गेली; आणि घ
ड्याचें दार ठोठावूं लागली; तों तो आंतून बोलि
ला; कोण आहे तें? ती ह्मणाली मी या मसणां
त राहून मेलेल्यांची सेवा करीत असत्यें. तुला
जेवण घेऊन आल्यें आहें, दार उघड. तो ह्मणा
ला, हांहां, तर माझे गड्यो, सध्या तूं जेवणाची गो
ष्ट येकीकडेस ठेव, आणि मला थोडासा सरा
प्यावयास आणूनदे, मी तुझा फार उपकारी हो
ईन. बायकोनें तें ऐकून कपाळावर हात मारि
ला, आणि ह्मणाली आहा कट कटा! मी मोटी
दैवहीन! याची खोड टाकवायास हा एकच उ
पाय राहिला होता, तोहि फुकट जाऊन आतां
मला इतकें खचीत समजलें कीं, याचें व्यसन हें,
हा मेल्या शिवाय कधीं जाणार नाहिं.

तात्पर्य

कोणतीहि गोष्ट सवे पडली नाहिंतों टाकतां
किंवा टाकवितां येईल. एकवेळ ती व्यसनीं
पडली असतां, मग सुटणें फार कठीण आहे.

गोष्ट

## गोष्ट १८५

### मनुष्य आणि मुरकुट

एक मनुष्य, मांडी उघडी टाकून, एका झाडाखालीं विसांवत होता, तीवर एक मुरकुट बसून दंश करूं लागलें; तेसमयीं मोठे रागानें त्याणें त्याजवर थापट मारिली; त्यांतून तें निसटून पुनः त्याच जागीं येऊन बसलें. त्यास त्याणें पुनः थापट मारिली; तें पुनः पळालें; या प्रमाणे पांच पंचवीस वेळ मांडीवर थापटा बसल्या, त्याणें त्या मनुष्याची मांडी मात्र सुजली; परंतु मुरकूट हातीं लागलें नाहीं. त्यावेळेस त्यास विषाद फार होऊन त्याणें वीरभद्राची प्रार्थना केली कीं, देवा, तूं माहां थोर आहेस; तुझ्या सामर्थ्या पुढें कोणी ठरत नाहिं; या दुष्ट मुरकुटानें मला फार उपद्रव मांडला आहे; तर यावर पराक्रम करून याचा प्राण घे, आणि मज दीनावर दया कर; याच्या डांसानें मी मोठे व्यथेंत आहें.

तात्पर्य

तात्पर्य

हलक्ये कामा करितां, मोठ्यास भीड घालणें, हें अज्ञान होय. जो अक्षय सुखदाता भगवान त्यास नाशवंत पदार्थांचे जोडीकरितां संकट घालूंनये.

---

गोष्ट १८५

दोन भांडीं

एक मातीचें, आणि एक पितळेचें, अशीं दोन भांडीं, कोणी एका नदीचे तीरीं ठेविलीं होतीं; तीं, वरून पूर येऊन वाहात चाललीं, तेसमयीं मातीचे भांड्यास चिंता पडली कीं, कदाचित् मी पितळेच्यावर आपटलों तर, फुटून जाईन. त्यास कष्टी पाहून, पितळेचें भांडें ह्मणूंलागलें, रे, तूं भिऊंनको, तुला मी सांभाळीन. मातीचें ह्मणालें, बाबा, तूं अमळ दुरूनच बोल; मला तुजपासून भय फार आहे; कांकिं, मी तुजवर आपटलों कीं, तूं मजवर आपटलेस, तथापि नाश माझाच होणार.

तात्पर्य

तात्पर्य

गरिबास श्रीमंताची सोबरीक, किंवा संगत, वि पत्तींत पाडिते. श्रीमंताचे शेजारीं असतां, हा भां डो, कीं तो भांडो, दोहोंकडूनही घांस गरीबा सच लागेल.

---

गोष्ट १८६

कोल्हा आणि वाघ

एके दिवशीं कोणी एक कुशळ तीरंदाज, अर ण्यांत पारधीस गेलाहोता, त्याणें बहुत साव जें जीवें मारिलीं, व कित्ती एकांच्या, मागें लाग ला. तें पाहून सर्व पशू घावरले; आणि त्रासा नें पळघेवून झाडी गुहां मध्यें भरून राहिले. तेसमयीं वाघ अवसानानें त्यांस ह्मणतो, अहो, मी जीवंत असतां आणि तुह्मास भय! असें झालें तर मला धिक् आहे. तर कांहीं चिंतानाहीं, तुह्मी धैर्य मात्र धरा, आणि माझे बळ शौर्यावर वि श्वास ठेवा; मी एकलाच तुह्मां सर्वांचा वैरी मा

रून

रून टाकितों. अशा मोटमोठाल्या अवसाना च्या गोष्टी सांगतो आहे, शेंपटी आपटितो आ हे, आणि रागानें भुईं उकरितो आहे. इतक्यां त एक तीर येऊन त्याचे कुशींत भरला. तेवे ळीं त्या वेदननें व्याकूळ होऊन, त्याणें मोठ्या नें आरोळी मारली, आणि तोंडानें पिसारा ध रून तीरास बाहेर काढतो आहे, तों, कोल्हा अ ग्रळ येऊन विस्मय करून त्यास पुसतो; बाघोबा, असा तो कोण बळकट असावा बरें, कीं ज्याणें तुमच्ये सारिखे महा प्रचंड पशुलाहि घायाळ के लें. वाघ बोलला, गड्या, माझा आंदाज़ा चुक ला; ज्याणें मला घायाळ केलें तो, तो समो रचा मनुष्य, जो आपणां पशूंस अजिंक्य आहे.

तात्पर्य

बळ, आणि शौर्य, हीं, मोटें काम करितात, जर त्यांच्या साहित्यास निवळ बुद्धि बळ आहे त र; तें नाहींतर, तींच उलटीं दुःख कारक होताहे त. नुसते बळ शौर्यवान् आहेत, ते, आपल्या सा

मर्थ्यावर

मर्थ्यावर भरंवसा ठेऊन, उतावीळ पणा करिता त; त्यांत त्याचें उलटें एकादें मर्म, अथवा ठाऊक नसे ल, तें ठाऊक होतें, आणि तेंच मग त्यांचे घाता स कारण होतें. बुद्धिमान् आणि युक्तिवान् आ हेत ते, महा बळवानासही वेसण घालूं शकता त. पशूंस जसा मनुष्य अजिंक्य, तसा बुद्धि र हित बळवानास, शाहाणा. चातुर्या वांचून बळ, तें जशी मनाआचे हातीं काठी: समोरचा रिका मे हातीं आहे, आणि डाव घाव आणता आहे, त र, तो त्याचेच काठीनें त्यास मारितो. तात्पर्य, सावजा सारिखी नुसती क्रूरता, अथवा बळ, हीं बुद्धि वानाचे डाव पेंचांपुढें चालत नाहींत.

———०❀०———

## गोष्ट १८७

## कोल्हा आणि मुखवटा

एका रात्रीस कोल्ह्यानें, एके मुखवटे वि कणाराचे दुकानांत प्रवेश केला. तेथें बहुत मु खवटे होते, त्यांतील एकावर पाय ठेऊन त्याज

कडे तो नीट न्याहाळून ह्मणतो; हें मोठें सुंद र मस्तक दिसतें; परंतु यांत मेंदु नाहीं, त्या अ र्थी हें घट्टेचे मात्र उपयोगीं.

तात्पर्य

ज्याचे मस्तकांत ज्ञान नाहीं, त्याचा नुसता सुंद रपणा, घट्टेचे उपयोगी आहे.

---

गोष्ट १९८

पारधी आणि चिमणी

एका पारध्यानें पक्षी धरायासाठीं, जाळें मांड लें होतें; त्यांत एक चिमणी पडली; ती विला प करून ह्मणत्ये; रे देवा रे देवा! मला काय सं कटांत घातलेंस! मीं असा तो काय अन्याय के ला आहे? मीं कोणाचे सोनें चोरलें नाहीं, किं रुपें चोरलें नाहिं: एका तांदुळाच्या दाण्या करि तां मला प्राणांत, हें पारिपत्य?

तात्पर्य

तात्पर्य

या विश्वांत न्यायाची रीति अशी आहे, किं, ए कादे गरीबानें स्वल्प चोरी पोटासाठीं केली असल्ये, तितक्यानें तो प्राणास मुकतो; आणि जे धनिक प्रतिष्ठित ह्मणून लोकांस लक्षावधि रुपयांस ना गवितात, ते, दुष्टमित्र, लांच, यांचे योगानें अक्लेश पार पडतात.

गोष्ट १८९

हरिण आणि सिंह

एका हरिणाचे पाठीस पारध्यांचे कुत्रे लागले, तो भयानें जीव घेऊन पळाला तो, एका गुहेंत शिर ला; तेथें सिंह होता, त्याणें त्याजवर उडी घातली, आणि तत्क्षणी पाडाव केलें. तो हरिण मरत्ये वेळे स आपणाशीं ह्मणतो, हरहर! काय मी हीन भा ग्याचा! मी मनुष्यांचे आणि कुत्र्यांचे हातून सुटा वें ह्मणून या गुहेंत आलों, तो या महाक्रूराचे, स र्व श्वापदांमध्यें बुभुक्षिताचे, हातीं सांपडलों.

## तात्पर्य

जे भयानें घाबरतात, आणि तें टाळावयास करितां, दुसरे निर्भय जागीं जावयाचा उद्योग करितात, ते अधीक विपत्तींत पडतात. कांकि, काळ विपरीत आहे तों, आपण जिकडे जाऊं, तिकडे अडचणीच आणील. आसाठीं धीर आहेत, ते एक पातकाचें मात्र भय बाळगितात; येन्हवीं या सर्व विश्वाचे तुकडे तुकडे झाले, किंवा, आकाश कोसळून पडलें, तथापि त्यांचें चित्त डगमगत नाहीं.

